95

# कुब्स व गॅदरिंग्साठीं





नाटकाला लागणारे पडदे व सीनसिनेरी, सर्व जातीचे पोषाक, तलवार, ढाल, केंसांचे टोप, मेकअप् वगैरे सामान भाड्यानें पुरविणारें भुलेश्वरमधील सुविख्यात

ठिकाण—



**"वनदेवी गंगावनें"**

—आमच्या येथें विकत मिळणारीं सुंदर व सडक, भरपूर केसांची 'वनदेवी गंगावनें' खरेदिण्यासाठीं आमच्या भव्य शोरूमला एकदां अवश्य भेट द्या किंवा लिहा—

# मगनलाल ड्रेसवाला

टेलिफोन नं. २०००९

७५।७५, भुलेश्वर, मुंबई नं. २.

रुपान्तरीत-कथासंग्रह

# किमया

लेखकः—ना. के. शिरोडकर

किंमत १।रुपया

प्रकाशनकालः—ऑक्टोबर १९४०

| प्रकाशक— | मुद्रक— |
| --- | --- |
| **शेठ हिरजी मोहनजी,** | नारायण गोविंद साळगांवकर, |
| शंकरबारी लेन, | न्यू विजयानंद प्रिं. प्रेस, |
| मुंबई नं. २. | खेतवाडी मेन रोड, |
| | आर. के. बिल्डिंग, मुंबई २. |

# ना. के. शिरोडकर यांचें वाङ्मय.

| **प्रकाशित** | **आगामी** |
| --- | --- |
| १ समईंतील ज्योत! (नाटिका) | १ दीपगृह ( कथासंग्रह ) |
| २ नवें जहाज (कथासंग्रह) | २ गालबोट (कादंबरी) |
| ३ पांखर (कादंबरी) | ३ वाटाड्या (लघुनिबंध) |
| ४ मातीचें घर! (कादंबरी) | ४ विलायती पंखे (कथासंग्रह) |
| ५ किमया (कथासंग्रह) | ५ चांदण्यांतील दृश्य (नाटक) |



[ कै. कु. **लिला शिरोडकर** ]

...माझा पुनर्जन्मावर विश्वास नाहीं. पण जर कां कधींकाळीं या मानव जातींत तूं पुन्हां जन्म घेतलास तर तो तुझ्याच कुटुंबांत घे, हें तूं जिथं असशील तिथं तुला माहित व्हावं या वेडया आशेनें, साहित्याच्या टीचभर चौकटांत उभारलेला तुझा—भगिनी प्रेमाचा हा स्मृति-स्तंभ – माझ्या व तुला विसरूं न शकणाऱ्यांच्या अंतःकरणांत अढळ वास करीत राहों....

१

# हिमालयाकडे पाठ फिरवून—

प्रात:काळची वेळ होती ती.

आकाशाचा एक कोंपरा तांबुस रंगानं न्हाऊन निघाला होता. तबेल्यांतील गुरं हंबरूं लागलीं होतीं आणि त्यांच्या गळ्यांतील घंटानाद मधून मधून चालू होता. वारा तर इतका गार सुटला होता कीं, गरम फडक्यांत बांधलेला बर्फाचा खडाच जणुं अंगावर ठेवल्यासारखा वाटे—

गांवांत एक देऊळ होतं. देवळाला लागून प्रवाशांना उपयोगी पडावी म्हणून एक धर्मशाळा बांधली होती. धर्मशाळेंत कांहीं माणसं साखरझोंपेचा अनुभव घेत होतीं. भगवीं वस्त्रें धारण केलेला एक वयस्क साधुपुरुषही पण त्यांत होता.

तो फैजपूरचा रहिवासी होता.

उजाडतांच धर्मशाळा सोडून तो रस्त्यावर आला.

त्याला अजुन कितीतरी लांब जायचं होतं. आज अनेक दिवस झाले. फारशी विश्रांती न घेतां तो मुशाफरी करीत होता. हिमालयाकडे जाण्याच्या कृतनिश्चयानं खेड्याला रामराम ठोकला होता त्यानं. देवावर त्याची विपुल श्रद्धा होती. तो अतिशय भाविक होता. संसाराचा त्याग करून पारमार्थिक जीवनाचा ध्यास घेतल्यामुळं त्याच्या आंगावर भगवीं वस्त्रें चढलीं होतीं. हिमालयाच्या पायथ्याशीं तपस्व्यांच्या रांगेंत बसून देवाला आळविण्याचा त्याचा मानस होता. उज्ज्वल तपश्चर्येवाचून देव प्रसन्न होणं शक्य नाहीं, अशा मताचा तो होता.

सुगंध दरवळला. पथिकानं जवळपास नजर फिरविली. कांहीं अंतरावर एक फुलबाग होती. तींत अनेक जातीचीं फुलं होतीं. क्षणांत पथिकाकडे त्यांचं लक्ष गेलं. तीं एकमेकांच्या कानाशीं तोंड नेऊन कांहींतरी कुजबुजूं लागलीं. कुणि विकट हास्य केलं. कुणि डोळे मिचकावले. कुणि टाळ्या पिटल्या. कुणि त्याच्या त्या भगव्या वस्त्रांविषयीं संशय प्रगट केला. ज्याच्या त्याच्या तोंडीं त्याची नालस्ती सुरू झाली.

क्रोधानं पथिक वेडापिसा झाला.

—पण लगेच त्यानं संयम केला—

क्षणभर त्यानं त्या फुलांकडे न्याहाळून पाहिलं आणि दुसऱ्याचक्षणीं तो त्यांना म्हणाला—“ फुलांनों, तुम्हाला काय

वाटलं ? या निंदाप्रहारांनीं हताश बनून हीं भगवीं वस्त्रं मी आंगावरून दूर सारीन म्हणून ? छे ! ती कल्पनाही करूं नका ! श्रद्धेनं पत्करलेल्या या ध्येयाला कोवळेपणीं नख लावण्याइतका मी नादान का आहे ? ”

पथिक पुढील मार्ग आक्रमूं लागला.

क्षणामागून क्षण गेले. मिनिटामागून मिनिटं गेलीं तासामागून तास गेले.

एकाएकीं पथिकाचा गळा तहानेनं सुकून आला.

तो कुठं पाणी दिसतं कीं काय म्हणून पाहूं लागला.

थोडें पुढें गेल्यावर कांहीं अंतरावर वहाणाऱ्या एका डोंगराळ झऱ्याकडे त्याची दृष्टि गेली. पळतच जाऊन त्यानं त्या झऱ्याला तोंड लावलं.

तोंच कुणातरी बालकाचं करुण आक्रंदन त्याला ऐकूं आलं. तृषा अपुरी सोडून पथिक जवळपास पाहूं लागला.

—अन् तो दचकला—भांबावला क्षणभर—

मोहापायीं वाकडं पाऊल पडलेल्या....प्रेमळ पण परिस्थितीनं निर्दय बनलेल्या....अपांग पतितेचं तें जिवंत नी कोवळं प्रतीक होतं....

जवळ जवळ पळतच पथिक त्या बालकापाशीं गेला. कांटे बोचूं लागले त्याच्या काळजाला. चटकन त्यानं त्या अनाथ अर्भकाला उचलून घेतलं. सर्वत्र तुच्छतेची

दृष्टि फिरविली. आणि शोकाकुल अंतःकरणानं त्यानं त्या अर्भकाच्या चेहऱ्याकडे पहात म्हटलं —" कमनशिबी !!"

हिमालयाकडे जाण्यासाठीं त्यानं संसाराकडे पाठ फिरविली होती. त्या कमनशिबी अर्भकाची दुर्दीनता पाहून हिमालयाकडे पाठ फिरवून त्याला संसाराकडे वळावसं वाटलं....

तो त्या अर्भकासह माघारीं परतला.

सुगंध दरवळला.

त्यानं पाहिलं, तो ती मघाचीच फुलबाग.

क्षणांत आंतील रोपट्यांवरील फुलं एकमेकांशीं कुजबुजूं लागलीं "अग, तोच ग तोच—"

पथिकानं त्यांच्या सुरांत सूर मिळवून म्हटलं—" हो, तोच—!!"

---

## समईतील ज्योत !

....गाजावाजा झालेल्या कांहीं नाटककारांच्याही कृतींत विसंगति आढळून येते तिचा या नाटिकेंत अभाव आहे, आणि त्याबद्दल लेखकाचं कौतुक करणं उचित होय. कथानक सुसंगत असून पात्रांचा स्वभावपरिपोषही चांगला साधला आहे. मनुष्याला बरीवाईट कृत्यें करावयास लावणारी प्रेरक शक्ति म्हणजेच परिस्थिति होय, हें तत्व या नाटिकेंत स्पष्टपणें उमटलं आहे.

नवजीवन.

२

# निसर्ग

—गांवचा उकिरडा हेंच आपलं जग मानणारी ती गोबऱ्या रंगाची कुत्री— माणसं तिला हांक मारीत—"राणी!"

—आणि तिच्या प्रेमावर आपलं स्वामित्व गाजविणारा तपकिरी रंगाचा तो बिनवारसी कुत्रा—लोक त्याला थट्टेनं म्हणत—"राजा !"

तें एक वाण्याचं दुकान होतं. दुकानांत वाणी उंस खात बसला होता. समोरच्याच रस्त्यावर राजानं बैठक मांडली होती. वाणी उंस चावायचा व तोंडांत जमा झालेला चोथा काढून राजावर फेंकायचा. राजा तें सारं निमुटपणें सहन करायचा.

इतक्यांत राणी रस्त्यानं येत होती तिच्याकडे राजाचं लक्ष गेलं. राजा उठून उभा राहिला. ती जागच्या जागीं थबकली.

त्या प्रथम भेटींतच ती प्रेमांत सांपडली. दोघांनाही तो अनावर मोह असह्य झाला. राजानं हळुच खूण करून राणीला जवळ बोलाविलं. ती जवळ आली. क्षणांत तिच्या कानाशीं तोंड नेऊन राजा म्हणाला—"राणी, तूं माझी होशील?"

राणीला तरी दुसरं काय हवं होतं ?

थोड्याच दिवसांत—

ह्या दोन प्रेमिकांच्या रक्ताची ग्वाही देत भटकणारीं—राजाराणीचीं तीं अपत्यें—तीं चिमुरडी नी गोजिरवाणी कुत्रीं भुकेविना तडफडूं लागलीं! तहानेनं व्याकुळलीं!! हालहाल होऊन मेलीं !!!

—पण राजाराणीला त्याचं काय ?

त्यांच्या प्रियाराधनेला पुन्हां ऊत आला.

राणीला दुसऱ्यांदा मुलं झालीं.

कांहीं दिवस तिनं त्या नुतन अर्भकाचं न्याय संगोपन केलं. पण पुढें ?....ती कंटाळली !!....संसारांत गढून पोरांच्या कळपांत वोटाळणं तिला आतां रुचेनासं झालं. वेडी-पिशी बनून ती प्रियकराच्या शोधार्थ निघाली. राजाही तिच्याच शोधांत होता. निसर्गाचं मूक सहाय्य त्यांच्या पाठीशीं होतंच, दोघांचा तोल सुटला. तीं तिसऱ्यांदा प्रेमांत गुरफटलीं. राजा नी राणी—

राजानं तिला विचारलं—"राणी, मुलांना कुठं ठेऊन

आलीस तूं ?"

राणी उत्तरली—"मुलं मोठी झालींत ! त्यांना आतां काय जपायचं ? त्यांची तीं समर्थ आहेत ! राजा, पोटच्या पोरांचा संभाळ करून रहायला आपण माणसं आहोंत का रे ?"

राजा हंसला.

राणीही हंसली.

विकारवश बनून राणी उद्गारली—"राजा !"

तिच्या सुरात सूर मिळवून राजा उद्गारला—"राणी !"

त्याचवेळीं कांहीं हाडकुळीं कुत्रीं—राजाराणीच्या प्रिया-राधनेची तीं जिवंत प्रतिकं, दूरवर कुठंतरी भुंकत होतीं भों भों करून—

——कालांतराने——

राजा राणीकडे आला. तो आज अतिशय दुःखी दिसत होता.

राणी गोंधळून त्याच्याकडे पाहूं लागली.

बराच वेळ झाला तरी त्याच्या तोंडातून शब्द फुटेना.

भीतभीतच राणीनं विचारून टाकलं—"हें काय राजा? तूं असा दुःखी कां ? बोलत कां नाहींस ? "

"राणी—"

"सांग, काय झालं ?....

"....आपलीं सर्व पोरं मारलीं गेलींत....! !"

"कुणाकडून?" राणीनं आकांतून विचारलं.

"कुत्र्यांना विष घालणाऱ्या म्युनिसिपालटीच्या लोकांकडून".

* * * *

राजाचं नी तिचं प्रियाराधन चालूच होतं.

....आणि उकिरड्यावरील उष्ट्या अन्नाला नवीन नवीन कुत्र्यांच्या रुपांत वारस निर्माण होत होते ....!!

३

# बातमीदाराची करामत

समोरासमोर तोंड करून ते दोन गांव उभे होते. मध्यें खाडीचं पाणी चुळबूळ करीत होतं. दोन्हीही किनाऱ्यांवर पाण्यांत लवणारीं हिरवीगार झाडें व सुकतीच्या वेळीं किनाऱ्याखालीं दिसणारी रेतीची ती संथ नी भव्य पट्टी, यामुळें तें दृश्य पहाणाऱ्याला मोठं आल्हाददायक वाटे. खेरीज दोन्हीहि गांवांत पाऊल टाकलं कीं त्या गांवांवर निसर्गाचा वरदहस्त तर नाहीं, अशी गोड शंका मनांत डोकावयाची. दोन्हींही गांवच्या लोकांना एकमेकांशीं सलगीचं नातं कायम ठेवतां यावं म्हणून गांवांत पऱ्हेळाची योजना होती. गांवचे लोक त्या पऱ्हेळाला 'तार' म्हणत. त्या तारीचा मक्तेदार खातु नांवाचा एक कोळी इसम होता.

पऱ्हेळ पैलतीरीं जात होता. खातुच्या हातचें वल्हें

पाण्याला मागें रेटीत होतं. आंत एकच व्यक्ति होती, सर्जे-राव इनामदारांची—

एकाएकीं पन्हेळ लवंडल्यासारखा झाला. असं कां व्हावं एवढा विचार करायलाही ती वेळ अपुरी होती. कारण पाण्यांतून वर सरकून एका मगरानं सर्जेरावांवर झडप घातली होती. क्षणांत विज चमकून जावी तद्वत् हा सारा प्रसंग चट-कन् घडला. आणि खातुचं तितक्यांत किंचित् दुर्लक्ष झालं असतं तर सर्जेरावाला पन्हेळांतून ओढून नेण्यांत मगर खात्रीनं विजयी झालं असतं. पण म्हणतात ना कीं, काळ आला होता पण वेळ आली नव्हती—

खातुला आठवण झाली. पन्हेळांत एक मासे पकड-ण्याचं जाळ होतं. जाळ्याखालीं एक मासे कापायचा सुरा होता. चटकन त्यानं तो हातीं घेतला. दुसऱ्याच क्षणीं मगर जखमी झालं. आरडाओरड करणाऱ्या सर्जेरावांची मुक्तता झाली. जखमी स्थितींत मगरानं तात्काळ पाण्यांत उडी टाकली. सर्जे-रावाच्या डाव्या कुशींतून रक्तस्राव चालू होता पन्हेळ आला त्या दिशेनं पुन्हां माघारी परतला—

दुसरे दिवशीं खातु एक नवीन बातमी घेऊन आला.

काल जखमी झालेलं मगर मेलेल्या स्थितींत किनाऱ्या-वरील वाळूवर येऊन पडलं होतं, हीच ती बातमी.

संध्याकाळच्या वेळीं मगर मरून पडल्या ठिकाणीं तीन

पांढरपेशे गोळा झाले होते. एक सर्जेराव, दुसरा फोटोग्राफर व तिसरा वर्तमानपत्रांना बातमीपत्रें पुरविणारा बातमीदार.

फोटो काढून झाला तेव्हां सर्जेरावांनीं दोन पांच पांचांच्या नोटा काढून त्या अनुक्रमें बातमीदार व फोटोग्राफर यांच्या हातावर ठेवल्या.

एक दिवस ' सत्यशोधक ' साप्ताहिकाचा एक ताजा अंक घेऊन पोष्टाचा शिपाई सर्जेरावांकडे आला. त्यावेळीं कांहीं कामानिमित्त खातुही सर्जेरावाकडे उपस्थित होता. सर्जेरावांनीं घाईघाईने तो अंक उघडून पाहिला.

आंतील एका सबंध पानावर 'इनामदाराचें प्रसंगावधान, या मथळ्याखालीं कांहीं मजकूर प्रसिद्ध झाला होता. सोबत सर्जेरावांचा फोटो व किनाऱ्यावर मरून पडलेल्या मगराचा फोटो अशीं दोन छायाचित्रें छापलीं होतीं. त्या दिवशींच्या खातुच्या पराक्रमाचें निर्भेळ श्रेय सर्जेरावांना दिलें होतें आणि केवळ त्यांनीं प्रसंगावधान राखल्यामुळें खातुचा पुनर्जन्म होऊं शकला अशी मखलाशी करून त्याबद्दल इनामदारावर अभिनंदनाचा नुसता वर्षाव केला होता. बातमीदाराकडून आलेली बातमी जशीच्या तशीच साप्ताहिकानं छापली होती.

क्षणांत तो मजकूर व ते फोटो यांकडे खातुचं लक्ष वेधून घेत सर्जेराव म्हणाले—" पाहिलसं खातू ?"

खातुला प्रश्न पडला,—मगराच्या राक्षसी जबड्यांतून बचावलेल्या सर्जेरावांचा फोटो मासिकांत प्रसिद्ध होऊं शकतो,

इतकंच नव्हे तर किनाऱ्यावर मरून पडलेल्या मगराचाही. पण ज्याच्यामुळें हें सारं कांहीं घडलं त्या खातुचा फोटो यांत कां नसावा ?

तोंच सर्जेराव म्हणाले—" फार तारीफ केली आहे बुवा तुझी या साप्ताहिकवाल्यानें ! "

खातूला वाचतां येत नव्हतं. तो ' आ ' वासून पाहूं लागला.

साप्ताहिकांत प्रसिद्ध न झालेला काल्पित मजकूर सर्जेराव त्याला वाचून दाखवित होते....“ या प्रसंगाचें सारें श्रेय खातुला दिलं पाहिजे ! त्यांनं प्रसंगावधान राखल्यामुळें इनामदारांचे प्राण वाचूं शकले ! त्यांना जीवदान मिळालं ! याबद्दल आम्ही खातुला धन्यवाद देतों—"

त्याला तें खरंच वाटलं. त्याचा चेहरा आनंदानं फुलून गेला.

---

## पांखर.

....या कादंबरीच्या वाचनानें वेश्याव्यवसायाची करुण आणि विदारक घटना समाजांतील विचारी जनतेपुढें जास्त तीव्रतेनं आली आणि त्या अनिष्ट घटनेचें निर्मूलन करण्याच्या कामीं समाजांतील प्रबुद्ध लोकांचें जर अधिक लक्ष वेधलें, तर लेखकाचं शरसंधान अचुक साधलें असें होईल. सामाजिक प्रश्नांचा विचार करणाऱ्या कार्यकर्त्यांनीं या कादंबरींतील वातावरणाचा अभ्यास अवश्य करावा असं सुचविलं, तर तें अस्तानीं मुळींच होणार नाही.

ज्ञानप्रकाश.

४

# दोन अपघात

एका इंग्रज गृहस्थाला चर्चगेट स्ट्रीटवरील त्याच्या रहात्या घरीं सोडून मानुएल स्टँडवर परतण्यासाठीं माघारी परतला होता. त्याच्या टॅक्सीचा वेग अतिशय जोरांत होता.

ती रात्रीची वेळ होती.

रस्त्यांत एक मनुष्य उभा होता.

मानुएलनें जोरजोरानं हॉर्न वाजवायला सुरवात केली. त्याला वाटलं तो मनुष्य आपणहून बाजूला सरकेल. पण छे! तो मुळीसुद्धां तिथून हालला नाहीं. मानुएलचा अंदाज सपशेल चुकला. त्याची टॅक्सी अगदीं जवळ येऊन टेपली होती. त्यानं प्रयत्नाची शिकस्त केली. पण व्हायचं तें झालंच! टॅक्सीचा जोराचा धक्का बसून आडवा आलेला तो इसम धाडकन् खालीं कोसळला—

टॅक्सी थांबवून मानुएल खालीं उतरला. खिशांतील काड्यांची पेटी काढून त्यानं एका पेटत्या काडीच्या प्रकाशांत त्या मरून पडलेल्या इसमाच्या देहावरून क्षणभर दृष्टि फिरविली आणि त्यांनं एक करुण उसासा सोडला. त्याला तिथं रहावेना. तरी बरं कीं रस्ता अगदीं निर्मनुष्य होता. प्रकरण पोलीसा-पर्यंत गेलं तर भलतंच व्हायचं, या भीतिनंही त्याचं काळीज धडधडूं लागलं होतं. क्षणांत तो पुन्हां टॅक्सींत जाऊन बसला. टॅक्सी चालू झाली.

रीतसर दुसरा दिवस उजाडला.

टॅक्सी दाराबाहेर उभी करून मानुएल जे. जे. हॉस्पिट-मध्यें शिरला. आज पंधरा दिवस झाले, न्युमोनियाच्या विकारानं त्याची बायको तिथं आजारी होती. मानुएलला पहातांच वॉर्डमधील त्याच्या ओळखीची एक नर्स जवळजवळ धांवतच येऊन त्याच्या समोर उभी राहिली. तिनं मान खाली घातली होती. दाटून आलेल्या गळ्यावाटे ती बोलून गेली—"गेली बिचारी !!"

काय समजायचं ते मानुएल समजला.

त्याला वाटलं, रात्रीं आपल्या हातून एक अपघात घडला त्याचा मोबदला देवानं आपणापासून हा दुसरा अपघात घडवून घेतला असावा——

त्याला वेड लागलं होतं कीं काय कुणास ठाऊक. हास्पि-

टलांतून काढता पाय घेतांच, टॅक्सी तिथंच सोडून तो कुलाबा पोलीस स्टेशनवर गेला. आणि एकाद्या निर्ढावलेल्या गुन्हेगाराप्रमाणं रात्रीं घडलेल्या अपघाताची बातमी त्यानं आपण होऊन तेथील अधिकाऱ्याला पुरविली.

अधिकाऱ्यानं स्मित वदनानं क्षणभर त्याच्याकडे पाहिलं. तोंडांतील चिरूट काढून बाजुला धरला. आणि त्यानं एका साध्या पोषाकांतील पोलिसाला हांक मारली.

पोलिस येऊन सलाम करून उभा राहिला.

" या माणसाला रस्त्यांला लावून दे ! " अधिकारी हुकमी स्वरांत पोलिसाला म्हणाला.

मानुएलचा दंड धरून पोलिस त्याला बाहेर नेऊं लागला.

पण तो तिथून हालायला तयार नव्हता. " मी खोटं सांगत नाहीं ! मी खरं तेंच सांगतों ! मीच त्याला मारला ! माझ्या मोटारी खालीं—"

अधिकारी त्याच्या आंगावर जवळजवळ ओरडून म्हणाला—"पागल! तुरूंगांत जाऊन पोटाची तजविज करायचा बेत दिसतोय तुझा ! अरे, निष्कारण मरायला तो मनुष्य तुझ्यासारखा माथेफिरू थोडाच होता ! तो मेला पण मोटारीखालीं आत्महत्या करून. तशा अर्थाचं पत्र पोलिसानां उद्देशून मरतांना त्यानं आपल्या खिशांत ठेवलं होतं. आणि तूं तर वर छाती करून सांगतो आहेस, की मी त्याला अपघातांत मारला.

बेवकूब नाहींतर काय ?...."

मानुएलचा दंड धरलेल्या पोलिसानं तात्काळ त्याला चौकीबाहेर काढला.

रस्त्यांत येतांच तो इकडे तिकडे पाहूं लागला. आंगा-वरच्या कपड्यांना आग लागलेल्या माणसाप्रमाणें मानुएल ओरडत सुटला होता—" ही इथं होती ! कुणितरी पळविलेली दिसते खास! १५९४५ नंबर! लबाडांनों, मोटारी पळवतां काय ?"

५

# बोरीचें झाड

एका डोंगरकड्यावर एक इमारत होती. पांच मजले होते त्या इमारतीला.

शेजारींच एक बोरीचं झाड होतं.

त्याला बोरं लागलीं कीं त्या इमारतींत रहाणाऱ्या भाडोत्री लोकांत तीं मिळविण्यासाठीं चढाओढ लागायची. इतकी चवदार होतीं त्या झाडाचीं बोरं—

इमारतीच्या तिसऱ्या माळ्यावर एक पंजाबी नर्तिका रहायची.

तिच्या ग्यालरींत कितीतरी रेशमी व भरजरी साड्या उन्ह लागावं म्हणून दोरीवर पसरल्या होत्या. त्यांच्यावर बसून उन्हाची प्रखर किरणें हुतुतूचा खेळ खेळत होतीं.

आंत नर्तिका तालिम घेत होती.

जवळच वस्तादजी हुक्का पीत होता.

तितक्यांत बोरीच्या झाडावर एक कावळा येऊन बसला.

त्यानं झाडाला त्याचं भवितव्य सांगितलं—"तुझे घडे भरलेत ! ! "

झाडानं विचारलं—" कां ? "

"त्या तिसऱ्या माळ्यावर पहा. तिथं दोरीवर घातलेली ती पिरोजी रंगाची साडी पाहिलीस नीट ? ती अगदीं खालीं उडी टाकण्याच्या बेतांत आहे बघ ! वारा तर तिच्या अगदीं हात धुवून पाठीस लागला आहे ! हीच साडी तुझा आतां घात करील बरं—"

"—माझा घात?—कां? काय संबंध तिचा माझा?—"

कावळा दाटून आलेल्या गळ्यावाटे म्हणाला—"नाहीं, तुला तें कळायचं नाही ! मनुष्य म्हटला कीं त्याच्या नांवामागें स्वार्थ हा आलाच ! स्वार्थासाठीं तो केव्हां आणि कसा कुणाचा गळा कापील याचा नेम नाहीं ! मला आहे या मनुष्य जातीचा अनुभव ! तुझ्याप्रमाणें एकाच जागीं बसून जीवन कंठीत नाहीं मी ! सतरा गांवचं रोज पाणी पितों ! आणि म्हणूनच मी काय म्हणतों यावर विश्वास ठेव—"

झाडाचा थरकांप झाला.

कावळा सांगत होता— " ती पिरोजी रंगाची साडी

वाऱ्याचा जांच असह्य होऊन आतां खाली उडी टाकणार. ती नेमकीच तुझ्यावर येऊन पडेल. अन् तसं झालं कीं साहजिकच तुझ्यावरील कांटे तिच्यांत शिरकाव करून बसतील. त्या तिसऱ्या माळ्यावर रहाणारी ती पंजाबी नर्तिका—त्या साडीची मालकीण—चटकन खालीं येईल ती साडी न्यायला. निदान १५० रुपयांची किंमत असेल त्या साडीची. अशी साडी फाटली तर तिच्यांत दम काय राहिला? याचा परिणाम असा होईल कीं तुझ्यावर चढून ती साडी न फाटतां हस्तगत करणं, तुझ्या कोवळ्या वयामुळें कुणालाही झालं तरी अशक्य होईल. त्यामुळं माणसाच्या हातून तुझ्या मुळावर कुऱ्हाडीचे घाव बसूं लागतील! थोड्याच वेळांत तूं खालीं कोंसळून पडशील! आणि असं झालं कीं तुझ्यावरील कांट्यापासून निर्वीघ्नपणें साडीची सुटका करण्यांत त्या पंजाबी नर्तिकेला यश येईल. नी नाहक प्राणाला मुकावं लागेल तुला ——"

कावळ्याची ती भविष्यवाणी खोटी ठरली नाहीं.

त्याचा शब्दान् शब्द खरा ठरला.

साडी पडते आहे असं पहातांच कावळ्यानं पंखाची फडफड केली होती. तो उडून दुसऱ्या एका झाडावर बसून ती गंमत खेदयुक्त दृष्टीनं पहात होता.

झाड कोसळून खालीं पडलं-

काट्यांपासून साडी अलग करण्यांत आली.

पांचपन्नास चेहरे त्या इमारतीच्या ग्यालरींतून खालीं डोकावून पहात होते.

त्यांना तो बोरीचा हृदयद्रावक शेवट पाहून दुःख झालं.

कां ?

—झाड तोडलं म्हणून ?

छे !

——तर तें तोडल्यानं प्रतिवर्षी त्यावर येत असलेल्या बोरांना आपल्या खादाड जीभेला कायमचं आचवावं लागेल या दुष्ट विचारानं——

---

## समईंतील ज्योत !

....परिस्थितीनं बेजार झालेल्या माणसाच्या नीतिमत्तेस किती सहजासहजीं खार लागतो हें या नाटिकेंत परिणामकारक रीतीनं दर्शविलं आहे. विचारप्रधान कलाकृति लिहिण्यास व्याख्यानबाजीची गरज नसते हें या नाटिकेवरून दिसून येईल. एकंदर नाटिकेंत स्वभावदर्शन बरं साधलें आहे.....

प्रतिभा

---

६

# इस्त्रीनें दिलेला दगा

त्याची तिशी कधींच उलटली होती. केंस मधून मधून पांढरे झाले होते. जवानी तर जवळजवळ संपुष्टांत आली होती. तरीहि प्रेम म्हटलं कीं त्याला भुरळ पडायची. त्याची प्रणयाची कल्पना अत्यंत सोज्वल होती. अनीतिच्या मार्गानं संपादिलेल्या प्रेमावर त्याचा तितकासा भरंवसा नव्हता. त्यामुळं साहजिकच तो विवाहसंस्थेचा कैवारी, निःसीम उपासक होता. त्याला स्वप्नं पडत, तीं सुद्धां प्रणयाचीं ! आपण लग्न करून संसार थाटल्याचीं ! पण स्वप्न म्हणजे ॲस्पेरीनच्या गोळ्याच ! त्यानं डोकेदुखी बंद होत असली तरी तिचा कडवटपणा नष्ट कसा होईल ?

सहस्र गोपिकांच्या मेळाव्यांत प्रणयक्रिडा करणाऱ्या मुरलीधरासारखी त्याची ती स्वप्नांतील भूमिका होती. पण

सत्यसृष्टींतील तो नायक, एक बेकार—लग्नाच्यामागें लागलेला एक अव्यवहारी प्रेमवीर होता—

लग्नासाठीं त्यानं एकच काय, पण असंख्य लटपटी आणि खटपटी केल्या. पण त्यांत त्याला यश आलं नाहीं.

त्यानं अखेरचा म्हणून आणखी एका प्रयत्नाला हात घातला. मोठ्या महत्प्रयासानं २० रुपये कुठून तरी उसनवट काढले. वर्तमानपत्रांतून 'वधू पाहिजे' म्हणून कांहीं जाहिराती दिल्या. सुदैवानं एक पत्र आलं. त्यांत 'मुलीला पहायला यावं' अशा अर्थाचा मजकूर होता. जाहिरातीचा खर्च वजा जातां उरलेल्या पैशांतून त्यानं एक सुट शिवून घेतला.

त्यानं 'साहेब' बनायचं ठरविलं.

सांगून आलेली मुलगी खेतवाडी ७ व्या गल्लींत रहात होती.

आणि हा रहात होता मांडवीच्या कोळीवाड्यांत.

शिंप्याकडून आलेला सुट त्यानं धुवून घेतला. शेजारच्या एका गुजराथी तरुणाकडून इस्त्री मागून घेतली. एरव्ही तो कंगाल वेषांत फिरायचा. आज तो सुटाबुटांत वावरणार होता.

—पहिल्यांदा त्यानं पाटलोण हातीं घेतली. इस्त्री करून ती स्वच्छ ठिकाणीं ठेवून दिली. आणि नंतर कोट हातीं घेतला.

डोक्यांत प्रणय 'वादळ' करत होता. कोटावरून हातांतील इस्त्री फिरत होती. भावी वधुची काल्पनिक मूर्ति डोळ्यांसमोर चितारून तिचं चिंतन करण्यांत तो त्या प्रसंगीं तन्मय झाला होता.

एकाएकीं इस्त्रीची गती मंदावली. तिला पकडून राहिलेला हातही काम करीनासा झाला.

—तरीहि तो आपल्याच नादांत दंग—

—अखेर व्हायचं तेंच झालं—

—इस्त्रीनं दगा दिला—

कारण, कोटाची इस्त्रीखालची जागा करपून तिथं एक मोठा डाग पडला होता.

त्यावेळीं आपल्या भावी वधुबरोबर कल्पनेच्या राज्यांतील एका निसर्गसुंदर अशा खेड्यांत 'मधुचंद्रा'च्या तयारीनं येऊन तो उतरला होता. त्यानं आपल्या प्रियतमेला एका फुल-वेलीच्या ताटव्याखालीं घट्ट पकडून ठेवून तिला गाढ आलिंगन दिलं होतं. तिचं पहिलं चुंबन घेतलं होतं—

जवळपास जळून गेलेल्या कपड्याची घाण सुटली होती.

तो त्या सुखस्वप्नांतून जागा झाला.

त्यानं 'आ' वासून पाहिलं.

औषध म्हणून विष प्राशन करणाऱ्या रोग्याप्रमाणें त्याची गत झाली होती त्या प्रसंगीं—

संतापून त्यानं इस्त्री कोपऱ्यांत फेकून दिली. कपाळावर हात मारून घेतला.

ढळढळा रडायला सुरवात केली.

—जसं कांहीं एकादं लहान मुलच—!!

७

# चप्पलविक्या

चालतां चालतां तो एकाएकीं थबकला. त्यानं आपला डावा हात ऐटीनं कानाशीं नेला. आणि आपल्या नेहमींच्या बसक्या आवाजांत ओरडून म्हटलं—
"चप्पSSलSSS"

मी आगाशींत उभा होतों.

चप्पलविक्यानें चपलांचे बरेचसे जोड डाव्या खांद्यावर टाकले होते. आंगांत मळकट सदरा व त्यावर तपकिरी रंगाचं जाकिट घातलं होतं. डोक्यावर लांब केंसांची टोपी होती. धंदा चपलांचा असूनही त्याच्या स्वतःच्या पायांत मात्र चप्पल नव्हती.

मी रहात असलेल्या समोरील इमारतीमध्यें एक मद्रासी

स्त्री उभी होती. तिचा नवरा कमिशनर ऑफिसमध्यें नोकरीला होता. त्या बाईनं चप्पलविक्याला वर बोलावून घेतलं. एक जोड पसंत केला. आणि विचारलं—"दर काय याचा?"

" सव्वा रुपया ! " तो म्हणाला.

बाईनं तो चप्पलजोड एका रुपयांत खरेदी केला.

खालीं येतांच चप्पलविक्याला आणखी एक गिऱ्हाईक मिळालं. त्याच इमारतीच्या तळाला असलेल्या एका विडीच्या दुकानांत बसणारी गांवसकरांची चंपू. ती १३।१४ वर्षे वयाची होती.

वर मद्रासी बाईनं खरेदिलेल्या नमुन्याचाच चप्पलजोड तिनंही त्याच्यापासून विकत घेतला. किंमत दिली एक रुपया.

पैसे खिशांत टाकून चप्पलविक्या रस्त्यांत आला. आणि कानाशीं डावा हात नेऊन त्यानं ओरडायला सुरवात केली—"चप्पऽऽलऽऽऽ"

लगेच मी त्याला हांक मारली.

समोरील मद्रासी बाई व खालीं गांवसकरांची चंपू या दोघांनीं खरेदिलेल्या नमुन्याचाच जोड मींहि त्याच्यापासून पहायला घेतला.

तो माझ्या हातीं देतांना तसलाच एक जोड समोरील मद्रासी बाईनंही नुकताच खरेदिल्याचं चप्पल विक्या मला सांगू

लागला. पण तें सांगतांना तसाच दुसरा एक जोड गांवसकरांच्या चंपूनंही आपणापासून विकत घेतला आहे हें सांगायचं मात्र त्यानं बुद्याच टाळलेलं दिसलं. एका विडीवाल्या पोरीचं उदाहरण पुढें केल्यास त्या नमुन्याच्या चप्पलजोडाकडे मी सहानुभूतिच्या दृष्टीनं पहाणं शक्य नाहीं अशी त्याची कल्पना असावी. उलट मोठ्याचं उदाहरण सांगितल्यानंच मी तो चप्पलजोड चटकन खरेदी करीन असं त्याचं व्यापारी धोरण असावं.

मी मात्र त्यावेळीं मनाशीं म्हटलं—" काय मनुष्यस्वभाव आहे ! कुणी सांगावं ? उद्यां गांवसकरांची चंपू तो विकत घेतलेला चपप्पलजोड आपल्या सगळ्या मैत्रिणींनां दाखवित सुटेल. प्राणापलिकडे त्या चप्पलजोडाला जपेल. कदाचित्त तो सुस्थितींत रहावा म्हणून त्याला एकाद्या ट्रंकेंत ठेवून द्यायला देखील ती पोर कमी करणार नाहीं. नपेक्षां ती मद्रासी बाई ! घरांतल्या घरांत पायीं घालून त्या चप्पलजोडाचे तळ एकदोन महिन्यांतच झिजवून टाकील. किंवा पायखान्याच्या दाराशीं तो ठेवून देईल. मर्जी नाहीं लागलीच तर उद्यां तो तसाच फेकून दुसरा विकत घेईल—"

—–आणि हा चप्पलविक्या मोठ्या अभिमानानं त्या मद्रासीबाईकडे चप्पल विकत घेतलं म्हणून बोट दाखवितो—

—असला मनुष्य स्वभाव !—

मी बेबीला हांक मारली. हातांतील चप्पलजोड काढून तिच्या हवालीं केला. नी म्हटलं—" आंत जाऊन हीं चपलं दाखव तुझ्या आईला ! काल ती म्हणाली होती कीं आपणाला चपलं हवींत म्हणून! पहा म्हणावं पसंत आहे तर—"

८

# देवाने केलेला उपदेश

विहीरीजवळ रिठ्यांचं झाड होतं. कपडे धुण्यासाठीं त्या विहीरीवर येणारी माणसं त्या रिठ्यांचा, तर कुणि साबणाचा उपयोग करीत. कपडे धुण्यासाठीं विहीरीशेजारींच एक दगड होता.

स्वतःला दुःखी नी अभागी मानण्यांतच त्या दगडानं आपल्या आयुष्याचा बराच मोठा काळ कंठला होता. जगणं हा दरेक वस्तुमात्राचा हक्क आहे. पण त्यालाही आपण अपात्र आहोंत अशी त्यानं आपली समजूत करून घेतली होती. कां कोण जाणे, पण सर्वांत ' भिक्कार ' वस्तु म्हणजे आपण अशा रीतीचं नैराश्यवादी वातावरण स्वतः-च्या हातानेंच त्यानं जीवनांत निर्माण केलं होतं. त्याच्या आशा मृतप्राय झाल्या होत्या. ध्येय मातीमोल ठरलं होतं.

भावनेचा अमोल साज गंजल्यामुळं निकामी ठरला होता.

काल रात्रौ गांवांत जत्रेचा दिवस होता. जत्रा आटपून त्या विहीरीकडून दोन वृद्ध माणसं आपल्या घराच्या दिशेनं जात होतीं. तो मध्यरात्रीचा सुमार असावा. त्यांपैकीं एक दुसऱ्याला त्या गांवच्या देवाची २८ वर्षांपूर्वींची कुळकथा सांगत होता. त्यावरून त्या विहीरीकडच्या दगडाला कळलं कीं हा देव म्हणजे दुसरा तिसरा कुणी नसून आपलाच एक जातभाई आहे. शिवाय आपल्या चांगलाच परिचियाचाहि पण आहे.

——आणि त्याचवेळीं आपण दुसरे दिवशीं त्या देवळांतील देवरुपी दगडाला जाऊन भेटावं असं त्यानं आपल्या मनाशीं ठरविलं.

दुसरा दिवस उजाडला.

विहीरीकडचा दगड देवळांत गेला.

त्याला भेटीला आलेलं पाहून देवाला आनंद झाला. देवानं त्याला जवळ बसवून घेतलं. विहीरीकडच्या दगडानं देवाला नम्रतापूर्वक विचारलं—"मित्रा, परिस्थितीनं तुला हा मोठेपणा लाभलेला आहे! लोक तुला सज्ञान समजतात! मी अज्ञान आहे! तूं नशिबवान आहेस! मी दुर्दैवी आहें! कारण जग मला जुमानींत नाहीं! पण तेंच जग तुझी पूजा करतात! मला तुझा मत्सर वाटतो! सांग, तुझ्यासारखंच

मला नाहीं का होतां येणार ?"

देवरुपी दगडानं जवळच्या नंदादीपाकडे पाहून एक दुःखद उसासा सोडला. क्षणभर गंभीर चेहरा करून डोकं खाजविलं, आणि त्यानं भेटीला आलेल्या मित्राला उपदेश करण्याच्या हेतुनं म्हटलं—"मित्रा, तूं समजतोस तितका मी भाग्यवान नाहीं ! हें देऊळ नाहीं ! ही बंदीशाळा आहे ! मी इथला कैदी आहें ! कैद्याला देव समजतात हे लोक ! पतितांचा परमेश्वर ! सत्त्याचा वाली ! जगाचा नेता समजतात माझे भक्तगण मला ! पण ह्या बंदिस्ताच्या अंतरंगांत क्षणकाल डोकावून पहाण्याची सुबुद्धि मात्र त्यांपैकीं एकालाही होत नाहीं ! मी इथं कुजत आहें ! आणि ह्या स्थितींतच एक दिवस जगाला अंतरणार ! काय उपयोग माझा जगाला ? त्यापेक्षां तूंच खरा भाग्यवान !! मित्रा, रोज असंख्य माणसांना कपडे धुण्यासाठीं का होईना पण तुझा उपयोग होतो ! तपेक्षां मी! जो स्वतः बंदिस्त असतो तो जगाला काय उपयोगीं पडणार ? आग लागो त्या जिण्याला !! जा ! आल्या वाटेनं परत जा ! माझ्या मोठेपणावर विश्वासून तूं स्वतःला कमी लेखूं नकोस ! जो देव माणसांचा गुलाम असतो तो देव ह्या शब्दास निःसंशय पात्र नाहीं !! —२८ वर्षांच्या दीर्घ अनुभवानं ठरलेला हा सिद्धांत मी आज तुला बोलून

दाखवित आहे.—"

बिचारा विहीरीकडचा दगड! तो आशेनं आला होता देवकळा प्राप्त व्हावी म्हणून! पण देवानं त्याची पुरतीच निराशा केली! दगड रहाण्यांत अतुलनीय असा आनंद त्याला झाला, तोही पण त्याच दिवशीं—त्याच घटकेला—

१

# तिच्या अपराधाचें कारण

चार दिवसांपूर्वी जिच्या सहवासांत आपली सारी रसिकता उधळून प्रत्यक्ष प्रीतिच्या काव्यांत ज्यानं आपलं हृदय बुडवून काढलं होतं, तोच मनुष्य आज तिचा गळा दाबून जीव घेण्यास प्रवृत्त झाला होता.

रस्त्यांत येतांच त्यानं एका रिक्शॉवाल्याला खुणावलं. जनावराऐवजीं माणसांनीं ओढावयाचं रिक्शॉ हें एक रस्त्यांतून चालणारं वहान. सद्यानी आंत बसला. कलकत्त्यांतील एका जुन्या भागांतून तें वाहन चालूं लागलं.

गेल्या रविवारची ती गोष्ट होती.

दिवस मावळतांच दोन वस्तु मिळविण्यासाठीं तो हॉटेलांतून बाहेर पडला होता त्या दिवशीं.

वेश्या आणि दारू.

पहिल्या प्रथम त्यानं दारू पैदा केली. 'तर्रर' झालेल्या स्थितींत स्वारी लगेच वेश्येकडे गेली. ती एक सुंदर बंगाली स्त्री होती. तिचं नांव होतं गुलरंभा. तिचा नमुनेदार केश-कलाप पाहून पंजाबांतील आपल्या जातींतील स्त्रियांच्या केश-कलापाबद्दल त्यानं तिच्याशीं नापसंती व्यक्त केली होती. तिनं मेंदीनं रंगवून काढलेले पायांचे दोन्ही तळवे व केसांच्या भांगांत शिंपडलेली पिंजर या गोष्टी त्याला मनापासून आवडल्या होत्या.

पंजाबमध्यें क्रिकेटचं सामान बनविणाऱ्या एका सुविख्यात कारखान्याचा प्रवासी प्रचारक या नात्यानं तो कलकत्त्यांत आला होता. पैशांचा त्याच्याकडे अर्थातच तुटवडा नव्हता. गुलरंभेच्या सौंदर्यावर आणि विशेषतः तिच्या स्वभावावर खूष होऊन त्यानं ठरलेल्या रकमेहून तिला बराचसा अधिक मोबदला बहाल केला होता.

—पण आज ?—

डॉक्टरला प्रकृति दाखवून तो दवाखान्याबाहेर पडला. त्याला गुप्त रोगानं पछाडलं होतं. गोंडस सौंदर्याखालीं जगाला धोका पोंहचविणारी एक गळेकापू स्त्री असं त्यानं क्षणापूर्वीं गुलरंभेचं वर्णन केलं होतं मनाशीं. आणि तडफडतच तिच्यावर दांतओंठ खात तो रिक्शांत येऊन बसला होता. केवळ गुलरंभेला चांगलीच अद्दल घडविण्याच्या दुष्ट हेतूनं—

ठरल्याप्रमाणें तो गुलरंभेकडे गेला. पण ती घरांत नव्हती. दाराबाहेर दोन व्यक्ति उभ्या होत्या. पैकीं एक स्त्री होती. सद्यानीला पहातांच ती त्याच्याजवळ आली. गुलरंभा डॉक्टरकडे गेल्याचं तिच्याकडूनच सद्यानीला कळलं. ती म्हणाली—"मी तिची कामवाली आहे. तुम्हाला तिला भेंटायचं आहे का? तर मग बसा आंत जाऊन थोडावेळ. येईल ती इतक्यांत—"

सद्यानी आंत जाऊन बसला.

कामवाली बाहेर उभ्या असलेल्या माणसाकडे जाऊन पुन्हां बोलण्यांत गढली.

सद्यानी हळुच दाराच्या आड जाऊन तीं दोघं काय बोलतात हें ऐकत उभा राहिला.

कामवाली त्या पुरुष व्यक्तीला लाचारपणें सांगत होती, "लाला, तूं जा पाहूं आतां एकदांचा! आतां तुझे फक्त ९ रुपये तिच्याकडे बाकी आहेत! फेरीवाला असला तरी तूं पडलास व्यापारी! राहिली एकाद्या गिऱ्हाईकाकडे थोडी रक्कम अडकून म्हणून एकाद्याची अब्रु घेणं बरं नाहीं! शिवाय गुलरंभा तुझं देणं कालांतरीहि बुडविणार नाहीं! गेल्या रविवारीं तूं तिची पैशासाठीं बेइज्जत केलीस! त्यामुळं तिला केवढं दुःख झालं याची तुला कल्पना नाहीं! तिच्याकडे त्याप्रसंगी एक फुटका दागिना देखील नव्हता! न पेक्षां तो एखाद्या सराफाकडे

गहाण टाकून तिनं तुझी रक्कम तेव्हांच चुकती केली असती ! खरं सांगू तुला ? ती आहे अलिकडे रोगानं पछाडलेली ! वास्तविक डॉक्टरी उपचार तिला तूर्त चालू आहेत ! रोगाला आराम पडेपर्यंत पुरुषाचं तोंड पाहूं नकोस असं तिला डॉक्टरनें बजावलं होतं ! पण त्या दिवशीं तूं पैशांसाठीं तिची केलेली बेइज्जत तिच्या हळव्या मनाला इतकी लागून राहिली कीं त्या पश्चातापाच्या भरांत तुझं देणं फेडतां यावं म्हणून गिऱ्हाइकाच्या नात्यानं चालून आलेल्या एका पुरुषाला ती पोर पत्करून बसली त्या रात्रीं ! ती संपूर्ण रात्र तिनं त्या पुरुषाच्या सहवासांत घालविली ! डॉक्टरी सल्लयाकडे तिनं जाणुनबुजून दुर्लक्ष केलं ! शेवटीं परिणाम व्हायचा तोच झाला ! साधारण बरा होण्याच्या पंथास लागलेल्या तिच्या रोगानं दुसरेच दिवशीं उचल खाल्ली ! तुला देण्यासाठीं म्हणून पैदा केलेली रक्कम अखेर तिला डॉक्टरच्या दवाखान्यांत वटवावी लागली ! ती तरी काय करणार ? लाला, जा तूं आतां ! येत्या रविवारीं परत ये ! मी तिला सांगून त्या दिवशीं तुझे पैसे खात्रीनं चुकते करायला लावतें ! हाच शेवटचा वायदा असं समज—"

पण लाला ऐकेना—

"—पैसे घेतल्याखेरीज मी मुळींच येथून हालणार नाहीं—! !" लाला निश्चयी स्वरांत उत्तरला.

दाराआड उभा राहून तो संवाद ऐकणाऱ्या सख्यानीचा

राग कुठल्या कुठें मावळला. त्याच्या हृदयांत चर्र झालं. त्यानं त्या कामवालीला आपणाजवळ बोलावून घेतलं. तिच्यापासून वस्तुस्थिति समजावून घेतली. खिशांत हात घालून पॉकिट बाहेर काढलं. त्यातून ९ रुपये काढून कामवालीच्या हातावर ठेवले. सह्यानीच्या सुचनेप्रमाणें तिनं ती रक्कम लालाला देऊन टाकली.

लाला विजयी मुद्रेनं निघून गेला.

आंत जाऊन एका कागदाच्या चिटोऱ्यावर सह्यानीनं लिहिलं— "तुला भेटावं म्हणून आलों होतों. पण तूं कधीं परत येशील याचा नक्की अंदाज नसल्यानं व आजच्या रात्रीच्या गाडीनं मला परगांवीं जावयाचं असल्यानें मी निघून जात आहे. पुन्हां कधींतरी भेटेन. तुझा, सह्यानी."

ती चिठ्ठी त्यानं गुलरंभेला देण्यासाठीं म्हणून त्या कामवालीच्या हवालीं केली. आणि तो जिना उतरून रस्त्याला लागला—

---

# " साभार स्वीकार "

उर्मिला मासिकाच्या दणकेबाज खपाबद्दल कुणाचंच फारसं दुमत नव्हतं. त्याच्या लोकप्रियतेबद्दलही कुणाचाच फारसा मतभेद नव्हता. अहमदाबादमध्यें तें प्रसिद्ध होत असे. त्याचे अंकही फारच नमुनेदार आणि सुंदर निघत असत. वाचकांची त्या मासिकाबद्दल थोडीशी तक्रार होती ती त्यांतील ललित विभागासंबंधीं. कारण त्या विभागांत प्रसिद्ध होणारें ललित-वाङ्मय उच्च अभिरुचीच्या वाचकांचं फारच कमी समाधान करी. पुरोगामी विचारसरणीच्या नांवाखालीं बहुतांशीं कलाहीन लिखाणच या विभागांत वाचकांना वाचवयास सांपडावयाचं. आणि असं असून कुणा कलावान लेखकानं एकादी चांगल्या दर्जाची गोष्ट पाठविल्यास ती मासिकाकडून हटकून ' साभार परत ' यायची. या मासिकाकडून लेखकांना मोबदला दिला जाई. माझं नांव धीरजलाल पाठक असं होतं. पण आजवर मी लिहिलेलं सर्वच लिखाण 'मुसाफिर' या टोपण नांवानं लिहिलं होतं. साह-

जिकच माझं खरं नांव मागं पडून गुजराथी साहित्यांत माझ्या टोपण नांवाभोंवतालीच कीर्ति नगारा वाजवित होती. अहंमन्यतेचा दोष पत्करूनही मी म्हणेन कीं, माझ्या गोष्टी गुजराथी वाचकांना त्यांतील नाविन्यामुळं फारच आवडत. वाचकांकडून मला याविषयीं आलेल्या असंख्य पत्रांवरून मी हें ओळखलं होतं. शिवाय माझे चार लघुकथा संग्रह या पूर्वीच पुस्तकरूपानं प्रसिद्ध झाले होते. त्यामुळं मी अगदींच नवखा राहिलों नव्हतों, इतकं असून मी उर्मिलेकडे पाठविलेल्या १।२ गोष्टी 'साभार परत' आल्या होत्या. एवढ्यानंच तिथं गोष्ट पाठविण्याचा नाद मी सोडून द्यायला पाहिजे होता. पण तो पुन्हां बळावलाच. आमच्या शेजारीं रहाणाऱ्या ठक्करबाप्पा नांवाच्या एका गृहस्थाची एक विधवा मुलगी शाळेंत मास्तरीण होती. काल माझी पत्नी तिच्याकडे बसायला गेली असतां उर्मिला मासिकांत मी लिखाण कां करीत नाहीं, म्हणून तिनं माझ्या पत्नीला प्रश्न केला. तिनं तरी खरी गोष्ट सांगायची; तर तेंही नाहीं. सौभाग्यवतीनं त्या मासिकांपेक्षां माझाच दर्जा शतपटीनं मोठा असल्याचं सिद्ध करण्याचा प्रयत्न केला. पण मास्तरीणबाईनां तें पटेना! वादाच्या भरांत ती माझ्या साहित्यांतील दर्जाविषयीं संशय घेऊं लागली. सौभाग्यवतीला तें सहन झालं नाहीं.

ती घरीं आली.

घडलेला एकंदर प्रकार तिनं मला सांगितला.

कसंही करून उर्मिलेंत गोष्ट प्रसिद्ध करून आणाच म्हणून सौभाग्यवती माझ्याशीं हट्ट धरून बसली. मी गोष्ट लिहिण्याचं कबुल केलं. पण ती पसंत होईल याला नेम काय ? हा उघड सवाल मी सौभाग्यवतीला टाकतांच ती म्हणाली—" मी सांगतें तसं करा. तुम्हाला न आवडणारी गोष्ट लिहून काढा. आणि द्या बेलाशक पाठवून ती उर्मिलेकडे—"

मला तिच्या सुचनेचं हंसू आलं.

मी गोष्ट लिहून काढली.

—पण पुन्हां वाचली नाहीं ! वाचावयासारखं त्या गोष्टींत मुळीं नव्हतंच कांहीं ! अगदीं ' भिकार, होती ती गोष्ट—

त्याच दिवशीं ती पोस्टांत टाकली. दोनच दिवसांनीं उत्तर आलं—" साभार स्वीकार "

---

११

# पिशाचसृष्टींतील प्रणय ?

भायखळा स्टेशनच्या बाहेरील रस्त्यावर कासमची व्हिक्टोरिया ताटकळत उभी होती. वेळ मध्यरात्रीची असल्यानं सर्वत्र सामसुम होती. ट्रामगाड्यांची ये जा बंद झाली होती. रस्त्यांत माणसंही अगदीं क्वचितच दिसत. आणखी कांहीं वेळानं भायखळा स्टेशनवर येणाऱ्या गाडीची वाट पहात कादर त्या ठिकाणीं थांबला होता. तोंच एक तरुण पारशी जोडपं त्याच्या गाडीशीं येऊन थडकलं. नव्या चौपाटीला जायचं होतं त्या जोडप्याला. कासमनं त्यांना येण्याजाण्याचं भाडं सांगितलं. तीं दोघं आंत बसलींत व्हिक्टोरीयावाल्यानं गाडी पिटाळली एकदांची—

गाडींत चुंबनाचे आवाज, धडपड आणि उसासे सुरू झाले. कासमला तो प्रकार नवीन नव्हता.

आंत बसलेल्या जोडप्यानं खालीं उतरून घेतलं. कुठंतरी एकांत हवा होता त्या जोडप्याला. चालत चालत तें जोडपं कांहीं अंतरावर असलेल्या एका झाडाच्या आड दडलं. आणि पुन्हा चुंबनाचे आवाज, धडपड आणि उसासे सुरू झाले.

भाडोत्र्याचा प्रणय आटपेपर्यंत आपण खुशाल झोंप काढावी असं ठरवून कासमनें पडल्या ठिकाणींच डोळे मिटून घेतले. चटकन त्याचा डोळा लागलाही.

कांहीं वेळानं त्या बाजुनं आणखी एक व्हिक्टोरिया आली. त्यांतही एक प्रणयी जोडपं होतं. पण तें तिथं आलं तें प्रणयांत रंगून जाण्यासाठीं नव्हे तर प्रणयाला विराम देण्यासाठीं. जवळच्या अक्राळविक्राळ समुद्रांत जोडीनंच उडी टाकून आत्महत्त्या करण्यासाठीं. त्या दोघांचं एकमेकांवर प्रेम होतं. पण त्या दोघांनीं लग्न करण्यास त्यांच्या आईबापांचा विरोध होता. पूर्ण विचारानं तीं दोघं मृत्युला कवटाळायला तयार झालीं होतीं.

त्यामुळं त्या जोडप्यानं व्हिक्टोरियांतून उतरतांक्षणींच भाड्याचे पैसे चुकते केले होते. तें पाहून गाडीवाल्यानं विचारलं होतं—"परत जाणार ना आपण ?" त्यावर त्या जोडप्यानं उत्तर दिलं होतं—" जातांना चालून जायचं आपणाला--"

व्हिक्टोरियावाला परतण्याच्या बेतांत होता. तोंच डाव्या दिशेनें दुसरं एक जोडपं येत असलेलं त्याला दिसलं. मघाशीं कासमच्या व्हिक्टोरियांतून आलेलं तें पारशी जोडपं होतं. त्याच्याजवळच कासमची व्हिक्टोरीया उभी होती. अजून कासम झोंपेतच दंग होता. त्या दुसऱ्या व्हिक्टोरिया-वाल्यानं कासमच्या झोंपेचा भलताच फायदा घ्यायचं ठरविलं. त्यानं तें जोडपं येत असलेल्या दिशेनं गाडी हाकारली. जोडप्याला वाटलं मघाशीं आपण आलों तीच ही गाडी असावी. गाडी जवळ येतांच तें जोडपं आंत बसलं चटकन. भाडं वगैरे ठरविण्याच्या फंदांत तो व्हिक्टोरियावाला तरी कशाला पडतो? दुसऱ्याचं भाडं त्याला स्वतःच्या पदरांत पाडून घ्यायचं होतं. रात्रीचा फायदा घेऊन डोळ्यावर धूळ फेंकायची होती त्याला त्या जोडप्याच्या. लबाडीनं पैसे उपटा-यचे होते त्याला.

कांहीं लांब आल्यावर तो गाडीवाला भलत्याच दिशेनं जात असल्याचं पाहून आंतील जोडप्यापैकीं एकानं त्याला विचारलं—" अरे, तूं कुठं चाललास? हा रस्ता तर दादरकडे चालला. आम्हाला भायखळ्याला जायचं आहे हें तूं विसरलास वाटतं ?—"

व्हिक्टोरियावाला तरी किती बिलंदर होता. त्यानं उत्तर काय द्यायचं तें दिलंच. आणि मोठ्या ऐटीनं गाडी

भायखळ्याच्या दिशेनं वळविली.

थोड्याच वेळांत गाडी योग्य ठिकाणीं येऊन थांवली. व्हिक्टोरियावाल्याच्या हातीं ठरलेलं भाडं पडलं. त्यानं गुपचुपपणें तें खिशांत टाकलं. स्वतःच स्वतःची पाठ थोपटली, आणि म्हटलं—"वारे पठ्ठे ! !"

तिथं कासम गाढ झोपेंत दंग होता. तो जागा झाला तेव्हां साधारण रात्रीचे दोन वाजले असावे. " अजून कसं नाहीं येत हें भाडेकरूं ? " असं मनाशीं म्हणत तो त्या जोडप्याला हुडकून काढण्यासाठीं गेला. पण तें जोडपं त्याला आतां कुठलं दिसायला ? तो निराश झाला. लगेच त्यानं तबेल्याच्या दिशेनं गाडी हाकारली. तो मनांत म्हणत होता—" ही पिशाच्चबाधा तर नाहीं ना ? " नी त्यानंच त्या प्रश्नाला उत्तर दिलं—" निःसंशय असंच असावं ! "

तबेल्यांत येतांच त्यानं आपल्या एका मित्राला ही हकिगत सांगितली. आणि तिला नांव दिलं—" पिशाच्च-सृष्टींतील प्रणय ? "

त्याचा तो मित्र तरी दुसरा कोण होता ? कासमच्या भाडोत्र्याला फसवून आपल्या व्हिक्टोरियांतून भायखळ्याला आणून त्याच्यापासून डब्बल भाडं उपटणारा हाच तो उपटसुंब ! त्याचं नांव होतं वस्ताद—

कासमच्या तोंडची हकिगत व तिला त्यानं दिलेली

भुताटकीची जोड यांचं रसभरीत वर्णन ऐकून वस्ताद मनाशीं म्हणाला—" काय मूर्ख मनुष्य आहे ! भुताटकीच्या रहस्य-पूर्ण हकिगती मिटक्या मारीत सांगणारीं माणसं तरी या मूर्खासमहून निराळीं तीं काय असतात ? "

---

## पांखर.

....लेखकांन स्वीकारलेल्या मतांचें विस्तृत विश्लेषण सुबोध आणि प्रतिष्ठित भाषेंत केलेलं आहे. यामुळेंच सामाजिक प्रश्नाविषयीं जिज्ञासा बाळगणाऱ्या व वेश्याव्यव-सायाकडे कुतूहलाने पहाणाऱ्या वाचकांना ही कादंबरी मनो-रंजक वाटेल.

प्रकाश,

---

१२

# आइसफ्रूट

शाळेला सुट्टी होती. तशांत पोरांची जात. मग दंगामस्तीला, आरडाओरडीला, धांवपळीला नी गप्पांना काय तोटा ?

सबंध चाळींत आज पोरांचंच राज्य होतं. नजर टाकावी तिथं पोरं. ग्यालरीत पोरं, जिन्यावर पोरं, आगाशींत पोरं—

जो तो आपल्याच रंगांत दंग होता. धोंडो नांवाचा एक मुलगा दोन तीन बरोबरीच्या मुलांसह जिन्यावर बसून आपण रात्रीं पाहिलेल्या सिनेमाची त्यांना गोष्ट सांगत होता. चांदरकरांची गोदू आपल्या मैत्रिणीसह फुगडी घालीत होती. भिकंभटाचा ज्ञानेश्वर ग्यालरींत उभा राहून पतंग उडवीत होता. राण्यांची मंजुळा आगाशींत जाऊन पांच सहा

मुलींच्या समवेत पाठाशिवणीचा खेळ खेळण्यांत गढून गेली होती. म्हात्रे नांवाचा एक मुलगा एका मुलाला पाठीमागें घेऊन ग्यालरीच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत सायकल चालवीत होता. दत्तोपंतांची बाबी स्त्री मासिकाचा एक अंक घेऊन त्यांत प्रसिद्ध झालेल्या आपल्या नुतन भावंडाचा फोटो एका मुलीला दाखवून तोंडानें त्या चिमुरड्याचं कोड-कौतूक करीत सुटली होती. आणखीही कांहीं मुलं निरनि-राळ्या प्रकारचे खेळ खेळून जिवाची मुंबई करीत होतीं.

आइसफ्रूट विकणारा एक पोऱ्या त्यावेळीं चाळींत शिरला.

खेळांत दंग असलेलीं त्या चाळींतील बहुतेक मुलं तो ओळखीचा आवाज ऐकून धावूं लागलीं. पैसा पुढं करणा-ऱ्याला पोऱ्या आइसफ्रूट विकूं लागला. जो तो विकत घेतलेलं आइसफ्रूट चोखीत होता. विकत न घेतलेलीं मुलंही तिथं आइसफ्रूटची थोरवी एकमेकांना सांगत होतीं. उगांच रेंगाळत होतीं. दुसरा तें खातो आहे असं पाहून लाळ घोटत होतीं. अशा मुलांपैकींच केसबा मास्त-रांची मुलगी प्रीतम ही होती. ती ५।६ वर्षें वयांची असावी. तिच्याबरोबर दुसरी एक मुलगी होती. तिला ती म्हणाली—" मी पैसा घेऊन येते. "

प्रीतम आपल्या आईजवळ गेली. तिनं तिच्याशीं पैसा मागितला. प्रीतमच्या आईच्या डोळ्यांत अकस्मात

अश्रु उभे राहिले. मुलीला जवळ घेऊन ती म्हणाली— " बेटा, कुठून देऊं तुला पैसा ? तुला चहा देखील मी आज साखर न घालतां दिला ! ते तर तुरुंगांत दिवस कंठताहेत ! सुटून आले कीं रोज देईन बरं माझ्या बाळीला आइसफ्रूट—"

प्रीतम शहाणी होती. दाराबाहेर तिची जोडीदारीण प्रीतम पैसा घेऊन येणार आणि आपण दोघीही मिळून आइसफ्रूट खाणार या आशेनं उभी होती. पण प्रीतम आली ती हात हालवीतच. जोडीदारणीनं आश्चर्यानं तिला विचारलं—" हें ग काय प्रीतम ? पैसा आणायला म्हणून मोठ्या ऐटीनें गेलीस आणि रिकाम्या हातांनीं परत आलीस ?"

प्रीतमनें संभावितपणें तिला उत्तर दिलं— " थंडी झालीय ग मला ! "

---

## मातीचें घर

कादंबरीला काश्मीरची पार्श्वभूमि ठेवल्यानें रंजकता उत्पन्न झाली आहे. कथानकाशीं सुसंबद्ध असलेला प्रश्न सामाजिकदृष्ट्या महत्वाचा आहे यांत संशय नाहीं.....

समीक्षक

---

१३

## स्वयंस्फूर्तीनं केलेला नमस्कार

—आणि तो जगतो कां तर जगण्याखेरीज त्याला गत्यंतर नाहीं म्हणून—

दारू आणि ताडी न पिणं हा गुण होत असेल तर त्याला निःसंशय गुणी म्हटलं पाहिजे. पण व्यसनी नसूनही तो कफल्लक कां रहावा? तर त्याला दैववादी माणसं उत्तर देतात—" त्याचं नशीब ! "

त्याची तिशीदेखील उलटली नव्हती. पण तो दिसायचा एकाद्या म्हाताऱ्यासारखा—

—उपयोग काय त्या तारुण्याचा ? —

एकादं लहान मूल दिसलं कीं त्याचीं अपत्यभूक जागृत होई. अंतर्यामीं वादळ उठून गर्जना करीत त्याच्या भावना—" मला नाहीं का बाप व्हावंसं वाटत ? "

—पण प्रामाणिक असूनही तो अपराधी होता. कारण त्यानं दारिद्री रहाण्याचा गुन्हा केला होता—

पाटीवाल्याचा त्याचा धंदा.

आकाशांत तांबडं फुटत आहे तोंच तो साखरझोपेंतून जागा व्हायचा. त्यावेळीं त्याच्या कृश शरिरांतील प्रत्येक स्नायु त्याला लेकुरवाळ्या आवाजांत ओरडून सांगायचा —" चहा ! "

—असले १।२ पैसे खिशांत तर थंडीवाऱ्यानें कुडकुडणाऱ्या त्याच्या देहाला चहाची ऊब मिळे. न पेक्षां नळाचें पाणी पिऊन चहाची तहान त्याला पाण्यावर भागवावी लागे !

करतो काय बिचारा ?

जीवनांत चहा लागोपाठ त्याला अत्यावश्यक भासणारी वस्तु—विडी !

——पण त्या सामान्य व्यसनासाठीं मात्र पैशापायीं तो कधीं अडून बसत नसे. कारण एकाद्या सार्वजनिक मुत्रीशीं उभें राहिल्यास—रस्त्यांत बारकाईनं दृष्टि फेकल्यास—त्याला ती वस्तु हटकून मिळायचीच. दुसऱ्यानं ओढून टाकलेलं विडीचं थोटुक—

हेल मिळविण्यासाठीं सकाळ संध्याकाळ तो प्रयत्नाची शिकस्त करी. घाम गाळून रक्त आटवी. धांवपळ करी इकडे तिकडे. तरीहि त्याला पोटाला मिळेच असं नाहीं. पैशाच्या अभावीं केव्हां केव्हां एकादंच जेवण जेऊन तो दिवस काढी. केव्हां केव्हां भजीं खाऊनच वेळ मारून

नेई. तर केव्हां केव्हां उपाशीं पोटीं देह झिजवी. जणुं काय जगाच्या मदांध संपत्तीनं ठोकरीनं उडवून दिलेला बहिष्कृत जीवच तो——

संध्याकाळ होती. आज त्याला हेल न मिळाल्या-मुळें तो उपाशीं पोटीं होता. दाढीचे केंस वाढले होते. फाटका सदरा व जागोजागीं ठिगळं मारलेल्या धोतरानं त्यानं आपलं शरीर झांकलं होतं. पाटी खांद्यावर मारली होती आणि रस्त्यावरील एका तारेच्या खांबाला टेकून हताश मुद्रेनं तो उभा होता. तोंच एक प्रेतयात्रा रस्त्यांतून जाऊं लागली. त्यानं चौकशी केली. दुनाईचंद मारवाडी ह्या मुंबईंतील प्रसिद्ध श्रीमान व्यापाऱ्याचं ते शव होतं. कोट्या-वधि रुपयांची लूट करण्याच्या हेतूनं सट्ट्यांत ओतलेल्या लाखों रुपयांची राख रांगोळी झाल्यामुळें पश्चात्ताप पावून त्यानं विष खाऊन आत्महत्या केली होती.

तारेच्या खांबाला टेकून उपाशीं पोटीं उभा असलेल्या त्या कंगाल पाटीवाल्यानं जवळच्या एका वाटसरूला विचारलं —" या लक्षाधिश मारवाड्यानं गरिबांसाठीं काय केलं आहे ?"

त्याला नकारात्मक उत्तर मिळालं.

त्याच बाजूनं कांहीं वेळानं दुसरी एक प्रेतयात्रा जाऊं लागली.

त्यानं चौकशी केली. कुणीतरी त्याला सांगितलं. मुंबईंतील प्रसिद्ध कामगार पुढारी कॉ. आनिलकुमार ओक यांचं तें शव होतं. गिरणगांवांतील चालू संपांत कामगारांच्या वतीनं निर्दय भांडवलशाहीशीं लढतांना पोलिसांनीं केलेल्या गोळीबारास तो बळी पडला होता.

पाटीवाल्यानं एका वाटसरूला विचारलं-"या पुढाऱ्यानं गरिबासाठीं काय केलं आहे ? "

त्याला होकारात्मक उत्तर मिळालं.

स्वतःला नकळत पाटीवाल्याचे दोन्ही हात वर उचलले गेले. त्यानं स्वयंस्फूर्तीनें त्या शवाला नमस्कार केला.

---

## समईंतील ज्योत !

....ही तीन अंकी नाटिका 'नवयुग नाट्य कार्पोरेशन' या नाट्यसंस्थेनं १६ फेब्रुवारी १९३५ रोजीं 'रॉयल ऑपेरा' मध्यें रंगभूमीवर आणली. परिस्थितीमुळं चांगला मनुष्य देखील वाईट काम करूं शकेल असं दाखविण्याचा हींत प्रयत्न केला आहे. तात्विकदृष्ट्या पाहिल्यास कोणतीहि गोष्ट परिस्थितीमुळेंच घडत असते....

समाजस्वास्थ्य.

---

१४

## कागदी फुलांचीं दुकानें.

रंगूनमधील ' चिना स्ट्रीट ' वर ब्रम्ही लोकांनीं चालविलेलीं कागदी फुलांचीं दोन दुकानं आहेत. पैकीं बाजाराच्या कोपऱ्यावर असलेलं दु–दु–मनाई यांचं दुकान फारच जुनं आहे. या दुकानांत बनविलेलीं कागदी फुलें ब्रह्मदेशांतच काय पण चीन जपान व अमेरिका इथंही खपतात, नाहीं खपत असत. सबंध रंगूनमध्यें कागदी फुलें बनविण्यांत या दुकानाचा हातखंडा होता. त्या दुकानाची बरोबरी करणं कित्येक वर्षे कुणालाच शक्य झालं नव्हतं. पण गेल्याच वर्षी को-का-त्रारू या इसमानं तिथं जवळपास कागदी फुलाचं नवीन दुकान उगडलं, आणि साहाजिक दु-दु-मनाईच्या दुकानाला एक चालता बोलता प्रतिस्पर्धी त्या बाजारपेठेंत निर्माण झाला.

को-का-बारूचं दुकान फारच जोरांत चालूं लागलं. अल्पावधींतच शहरांतील कागदीं फुलांचा तो सम्राट ठरला. ज्याच्या त्याच्या तोंडीं त्याच्या दुकानांतलि वैशिष्टच्यपूर्ण मालाची स्तूति ऐकूं येऊं लागली. एकेकाळीं सतरा धंदे करून अयशस्त्री ठरलेला पण आज 'सबसे सवाई' म्हणून लोकांकडून ओळखला जात असलेला को-का-बारू मातींतून सोनं निर्माण करणारा कलाकार म्हणून सबंध रंगूनभर गौरविला जाऊं लागला.

हळुहळू गिऱ्हाईकांचा तुटवडा पडूं लागल्यामुळें दु-दु-मनाईचं दुकान ओस पडूं लागलं. आपल्या प्रतिस्पर्ध्याला शह देणं ही गोष्ट त्याला त्याच्या आटोक्याबाहेरची होती. " जुनं तेंच सोनं ! " ही म्हण पुढें करून तो आपल्या कल्पना दारिद्र्यावर पडदा पाडण्याचा प्रयत्न करी. पण त्यांत त्याला बिलकूल यश येत नसे.

याला उत्तर म्हणून को-को-बारूनें आपल्या दुकानावर ठळक अक्षरांत लिहिलं होतं—" जुनं तें सारंच सोनं नव्हे ! "

त्या दिवशीं एक ब्राह्मी युवती कागदी फुलं विकत घेण्याच्या उद्देशानं दु-दु-मनाईच्या दुकानांत शिरली. तिनं दुकानांतील बहुतेक फुलांच्या सर्व जाती डोळ्याखालून घातल्या. पण तिचं समाधान होईना. ती नापसंतीच्या स्वरांत

म्हणाली—" तुम्ही आतां म्हातारे झालांत दु-दु-मनाई ! "

" कां ? "

"—जग धांवत आहे !—आणि तुम्ही मात्र पूर्वी उभे होतां तिथंच—"

दु-दु-मानाईनं त्या पोरीचा मानस ओळखला. त्यानं तपकिरीची चिमुट नाकांत कोंबली; आणि तुच्छतेनं म्हटलं —" पोर आहेस झालं ! "

" न पेक्षां त्या को-का-बारूचं पहा कसं ठीक चाललं आहे तें ! त्याला एका क्षणाचीही फुरसत नाहीं मिळत कुणाशीं बोलायला ! पण तुम्ही पहावं तों अलिकडे गिऱ्हाईकांशीं चकाट्या पिटीत बसलेले दिसतां संबंध दिवस या दुकानांत—"

पोरीच्या तोंडून ती को-का-बारूची तारीफ ऐकतांच दु-दु-मनाईचं पित्त खवळलं. तो आपल्या प्रतिस्पर्ध्यावर मनांतून दांतओंठ खाऊं लागला. त्याची असंख्य कुलंगडी ढोलावर काठी मारावी तद्वत तो बोलून दाखवूं लागला. शक्य होती त्या रितीनें त्याची नालस्ती करण्याचा त्यानें सपाटा चालविला. तोंडाला येईल ते अपशब्द तो को-का-बारूला बहाल करूं लागला.

पण त्या ब्रह्मी मुलीनं त्याला उत्तर दिलं तें किती मार्मिक ! मानसशास्त्राची कुरूपता दर्शित करणारा पारा

बसविलेला आरसाच जणुं ! ती म्हणाली—"दु-दु-मनाई प्रकाशाला अंधार म्हटला म्हणून त्याचं तेज कधीं कमीं होतं का ? नव्याचा उत्कर्ष पाहून जुन्याच्या अंतःकरणांत मळमळणं हा एक मनुष्य स्वभावच आहे मुळीं ! त्याला तुम्हीच तेवढे पारखे कसे होणार बरं ?—"

—आणि त्या ब्रह्मी मुलीच्या म्हणण्यांत चूक तरी काय होती?—

१५

## " माझी ऽ ननीऽ ऽ ऽ "

काय पण सुंदर आवाज ! जणुं काय एकाद्या कोकि-ळेनं नाजुक गळ्यांतून काढलेला गोड आलापच ! एकाद्या रंगभूमीवर नाट्य-तारका म्हणून शोभून दिसण्याइतका तिचा शरीरबांधाही तिच्या गोड आवाजा इतकाच सहज सुंदर होता. आंधळ्या बापाचा हात खांद्यावर धरलेल्या स्थितींत रस्त्यांतून जातांना मधून मधून गाणं थांबवून ती भिकेसाठीं याचना करी. चाळीचाळींतून लाचारपणें दृष्टि फिरवी.

एका खिडकींत तारानाथ उभा होता. त्याचं सारं लक्ष त्या भिकारणीकडे लागून राहिलं होतं. आधींच त्याची वृत्ति चंचल भुंग्यासारखी. स्त्रियांचे आकर्षक मुखवटे पाहून आपल्या स्वैरवृत्तींचं प्रदर्शन करणारा व असंख्य प्रेमभंगामुळें

दुखावला गेलेला हा नादान तरुण, म्हणजे पिंडावर नजर ठेवून बसलेला कावळाच जणुं—

अशा हीन वृत्तीच्या तारानाथाला आधींच सुंदर असलेली ती भिकारीण सौंदर्यांचा एक कलात्मक नमुना वाटला तर त्यांत नवल काय आहे ?

त्यानं त्या भिकारणीला आपल्या खोलीवर बोलावून घेतलं. तिला एक चीज गायला लावली. भिकारणीचा आंधळा बाप कोपऱ्यांत बसला होता. ती गात होती गाणं संपलं. एक रुपया काढून तारानाथानं तिच्या हातावर ठेवला. आणि विचारलं—" तुझं नांव काय ? "

" ननी "

"तूं भिक कां मागतेस ? "

सगळेच वकिली प्रश्न ! अन् त्यांना मिळणारीं साधीसुधीं उत्तरें ! तारानाथाच्या त्या वकिली डावांत ननी सपशेल चीत झाली.

" पोटाला कांहीं कामधंदा मिळाला तर भिक मागणं सोडशील ? " हा सवाल तारानाथानं तिला केला.

तिनं होकारार्थी उत्तर दिलं.

तारानाथानं स्वतःकडेच तिला अखेर नोकरीला ठेवून घेतलं.

कांहीं दिवसांनीं त्याच्या घरची नोकरी हें तिच्या आयु-

ष्यांतील एक सुखस्वप्न ठरलं. तिचे दिवस मजेंत जाऊं लागले. तिला आपण पूर्ण सुखी आहोंत असं वाटूं लागलं.

आपल्या आंधळ्या बापाकडे तिचें आतां क्वचितच लक्ष असे.

पाण्याच्या आश्रयावर ज्याप्रमाणें मासळींचं जीवित अवलंबून असतं, तद्वत तारानाथाखेरीज ननीला आतां जगणंच मुळीं अशक्य होतं.

एक दिवस तारानाथाबरोबर ती कर्नाटकांत पळून गेली.

—बिचाऱ्या आंधळ्याच्या कानावर ज्यावेळीं ही बातमी आली, त्यावेळीं त्या गरीब बापड्याची वृत्ति पंख कापलेल्या पांखरासारखी झाली—

० ० ०

त्या दिवशीं अन्नाशिवाय तडफडत असलेल्या आंधळ्यासमोर त्याच्या नांवाची दहा रुपयांची मानिआर्डर घेऊन पोस्टमन दारांत उभा होता.

आंधळ्यानें विचारलं— "कुणि पाठविले हे रुपये ?"

" ननी नांवाच्या एका स्त्रीनें."

ननीचें नांव काढतांच आंधळा दांतओंठ खाऊं लागला. पण मायेच्या स्पर्शानं त्या पाषाणाचंही शेवटीं पाण्यांत रुपांतर झालं.

" माझी ऽ ननी ऽ ऽ ! "

० ० ०

—पोटांत भुकेचा वणवा पटलेल्या त्या निराश्रीत आंधळ्यानें दाराशीं चालून आलेल्या त्या मदतीचा स्वीकार केला असेल का ?....नाहीं ! तो पापाचा पैसा स्वीकारून त्याला आपल्या दारिद्र्याला कलंक लावायचा नव्हता—*

[ दिल्लीला प्रसिद्ध होणाऱ्या ' नवयुग ' मध्यें प्रस्तुत लेखकाची १९३४ सालीं मूळ मराठीवरून हिंदींत भाषांतरीत झालेली लघुकथा ]

१६

# झेंडा

घार आकाशांत विहार करीत होती.

खालीं एका भव्य वाड्यांतील छप्परवजा घुमटावर एक झेंडा डौलानें फडकत होता. त्या वाड्याचं तें भूषण होतं. झेंड्याचं सूत जाड होतं. रंग भडक होता. पण अंतःकरण किती विशाल—

घारीला वाटलं आपणही त्या झेंड्याखालीं जाऊन बसावं.

पण तिनं त्यासाठीं घाई मात्र केली नाहीं.

ती मनाशीं म्हणत होती—"आपण सर्व कांहीं पूर्ण विचारानंच केलेलं बरं ! ज्या झेंड्यांत राष्ट्रीयत्वाच्या उज्वल कसोटीस उतरण्याची पात्रता आहे, ज्या झेंड्याची स्वातंत्र्य कमावण्याइतकी पुण्याई आहे, ज्या झेंड्याखालीं एकवटलं असतां पारतंत्र्याचा काळिमा धुवून टाकणं शक्य आहे, त्या

झेंड्याखालींच आपणही जाऊन बसावं, स्वातंत्र्याच्या तपश्चर्येचा जप चालू करावा—"

विचारांत अधिक रममाण होण्यासाठीं म्हणून ती तशीच पळत सुटली. तिचे पंख एकमेकांवर जोरानं आपटूं लागले.

रस्त्यांत खालीं दृष्टि फेंकली असतां तिला आणखी कांहीं झेंडे फडकतांना दिसले. त्यापैकीं कांहींनीं घारीला आपणाकडे येण्याविषयीं खुणावलं. त्यांचं तें खुणावणं गोड ! भाषा गोड ! आलापही गोड ! पण स्वातंत्र्याच्या नांवाखालीं अनेक सूर काढणाऱ्या त्या झेंड्यांपैकीं आपण कोणत्या झेंड्याखालीं जाऊन बसावं हें घारीला समजेना. तिची मनस्थिति चलबिचल झाली. तिला क्षणभर कांहीं सुचेनासं झालं.

इतक्यांत आकाश काळवंडून आलं. विजा चमकूं लागल्या. मेघरुपी ढोल मोठमोठ्यानं वाजूं लागला. आधींच कैफ केल्यामुळें वारा झुकांड्या देत होता. अकस्मात त्याचीही शुद्ध हरपली. तो मनमानेल तसा धिंगाणा घालूं लागला. रस्त्यावरील धूळ वर उसळूं लागली. झाडझुडपं थरथर कापूं लागलीं. समुद्र बेसुमार खवळला. घरेंदारें कोंसळून पडतात कीं काय असा भास होऊं लागला. जिथं तिथं पाण्याचे लोट बेफाम चुळबुळ करतांना दिसूं लागले. जनता घाबरली. 'काय होतं नी काय नाहीं !' असं तिला होऊन गेलं.

—इतकं भयंकर स्वरूपाचं वादळ कधींच कुणी पाहिलं नव्हतं—

अजूनही घार आकाशांत विहार करीत होती.

दीर्घ कालानंतर वादळ शांत झालं. तिला झेंड्यांची आठवण झाली. तिनं दृष्टि फेंकली तों तिला खुणावणारे झेंडे तिला कुठं दिसेना. त्यांना उंचावर फडकविणारे खांब वादळांत मुळासकट कोलमडून पाण्याच्या लोटाबरोबर वाहून गेले होते.

नाहीं म्हणायला एकच झेंडा त्या वावटळीला तोंड देऊन अजूनही वाऱ्यावर फडकत होता. त्याचं कार्य अविश्रांत सुरू होतं. तो झेंडा म्हणजे, घारीच्या मनांत पहिल्या प्रथम ज्या झेंड्यानं स्वातंत्र्याचे पडसाद उमटविले होते— जो एका भव्य वाड्यांतील छप्परवजा घुमटावर डौलानं फडकत होता—तो—

घार अधिक विचार न करितां त्या झेंड्याखालीं जाऊन बसली.

सहज तिची नजर वर गेली.

शेंकडो पुण्यवंताच्या पुण्याईमुळें त्या झेंड्याला उंचावर फडकण्याची स्फूर्ति मिळत होती. चरखा हें त्या झेंड्याच्या अग्रभागीं झळकणारं निर्भेळ स्वातंत्र्याचं प्रतीक होतं. अक-स्मात आकाशांतून एक पंख लावलेली देवदुतिका तिथं येऊन

उपस्थित झाली. तिचा एकंदर थाट अप्सरेलाही लाजविणारा होता. एक ताज्या फुलांचा सौगंधिक हार तिनं हातीं धरला होता. तो त्या राष्ट्रीयत्वानें नटलेल्या झेंड्याला तिनं वाहिला. आणि क्षणांत आकाशवाणी झाली "वंदे मातरम् !"

१७

## भाऊच्या धक्क्यावरील हमाल

गोव्याकडून आलेली आगबोट मुंबईत भाऊच्या धक्क्याला येऊन लागली होती. शिडी लागतांच लाल पैरणवाल्या हमालांनीं भराभर बोटींत उड्या टाकल्या. गोव्याकडचे उतारू कस्टमच्या आवारांत शिरले. इतरांनीं कस्टमचं नियंत्रण नसलेल्या दरवाजाकडे मोर्चा वळविला आपला.

केसूनं एका हमालाला हांक मारली. त्याच्याबरोबर दोन ओझीं होतीं. एक पत्र्याची बॅग. दुसरी गळ्यांपर्यंत तुडुंब भरलेली गोण. तिच्यांत सहा आडसरं, एक घरावरचा भोपळा व ४।५ शें खारे बांगडे होते. गोणीच्यावर एक हीरांचा झाडू बांधला होता. शिवाय, आंत एक घासलेटचा पॅकबंद डबा अक्कल हुषारीनें लपवून ठेवला

होता. मात्र त्या डब्यांत घासलेट नव्हतं. गोव्याची दारू होती. वास्तविक केसू आला होता गोव्याकडूनच. पण त्याच्या हातीं तिकीट मात्र वेंगुर्ली ते मुंबई या दरम्यानचं होतं. बोट वेंगुर्ल्याला येऊन टेपतांच आधींच रचून ठेवलेल्या कटांतील आपल्या एका हस्तकाकरवीं त्यानं बोटीवर बसल्या ठिकाणींच वेंगुर्ली ते मुंबई या दरम्यानचं तिकीट मिळविलेलं होतं. हमाल जवळ येतांच गोण उचलून त्यानं त्याच्या डोक्यावर ठेवली. त्याचा ४३ हा नंबर निरखून पाहिला. आणि त्याला मागून येण्यास सांगून वेंगुर्ल्याचं तिकीट पुढं करीत केसू तडक दरवाजाबाहेर पडला. त्यानं मागं वळून पाहिलं. पण तो हमाल कुठं होता? गोण तशीच धक्क्यावर टाकून गोव्याच्या एका क्रिस्तांवणीचं सामान उतरविण्यांत तो गढला होता. तें उतरून होतांच तो गोणीच्या मालकाला हुडकूं लागला. केसू त्याचीच वाट पहात होता. उभयतांची दृष्टिभेट झाली. ४३ नंबरचा हमाल धांवतच केसूजवळ येऊन थडकला. तो म्हणाला—" केव्हांपासून मी तुम्हाला पहातों आहे! ती क्रिस्तांवीण सामान ने म्हणून मागं लागली, आणि तेवढ्यासाठीं तुमची डोक्यावर चढविलेली गोण मला कांहींवेळ धक्क्यावर ठेवून द्यावी लागली. बरं आतां असं करा. मी ती गोण घेऊन येतों. आपण वेंगुर्ल्याकडून आलों असून

आपलीच ती गोण आहे असं दारावरील त्या तिकीटमास्तरला येऊन सांगा. न पेक्षां, गोण बाहेर काढायला तो हरकत घेईल!" असं म्हणून त्याच पावलीं तो आंत गेला.

केसूच्या पोटांत धस्स झालं. त्याच्या मनांत आलं कीं या हमालानं आपलं बिंग तर ओळखलं नाहीं? काय नेम घ्या! कदाचित्त तसं असलंच तर मग पुराव्यानिशींच आपण पोलिसांच्या हातीं पडूं! त्यापेक्षां आपण ही गोण येथेंच सोडून पळ काढावा हेंच बरं!" आणि ही विचार-सरणी सुरू होतांच हमालाचा डोळा चुकवून केसूनं तत्काळ पलायन केलं तेथून—

क्षणांत हमाल ती गोण घेऊन दरवाजापाशीं आला. पण गोणीचा मालक कांहीं त्याला तिथं दिसेना. मास्तरचा डोळा चुकवून त्यानं कसीबशी ती गोण समोरच्या हॉटेलांत नेऊन ठेवली. तो पुन्हां बोटीच्या आवारांत सरकला.

१२ वाजले. एक वाजेपर्यंत ताटकळत हमालानं गोणीच्या मालकाची वाट पाहिली. तो थकला. अक-स्मांत त्या गोणींतील मालाविषयीं त्याला संशय आला. त्यानं गोणीचं तोंड उघडून संशयाला वाट फोडली. पहातो तों आंत दारू!

गोणीचा मालक एकाएकीं अदृश्य होण्याचं कारण त्याला आतां उमगलं. हमालानं विचार करकर केला.

आधींच तो अस्सल दारूबाज ! तशांत ती काजूची, गोव्याची दारू ! दुर्मिळ चीज ! त्यानं ती स्वतःच लांबविण्याचं ठरविलं. तो ती गोण घेऊन आपल्या खोलीवर गेला.

त्या रात्रीं जोसेफ आपल्या कामावरून येतांच त्यानं त्याला हांक मारली. जोसेफ हा त्याचा शेजारी. तो शिपी होता. त्याच्याशीं ४३ नंबरच्या हमालाचं बरंच सख्य होतं. दोघेही बेवडेबाज. साहजिकच हांक मारतांच जोसेफ त्याच्या खोलीवर आला. हमालानं त्याला आमिष दाखविलं, जोसेफच्या तोंडाला पाणी सुटलं. काजूची दारू ! तो हर्षभरानं नाचूं लागला.

क्षणांत त्यानं ४३ नंबरच्या त्या हमाल मित्राला सांगितलं—" एक पाहुणा आला आहे माझ्याकडे आज. तुझ्यामाझ्यासारखाच दारूबाज. तूं सांगत असशील तर त्यालाही बरोबर घेऊन येतों."

हमाल रंगांत येऊन म्हणाला—" एकच काय पण असले शंभर पाहुणे आले तरी त्यांना ' ओले ' करून टाकीन मी. चल लवकर घेऊन ये त्याला—"

हमालानं एक फाटकी चटई अंथरली जमिनीवर. २।३ ग्लास तिथं साफसफाई करून ठेवून दिले. शेव-भजीं यांच्या दोन पुड्या तिथं रीतसर सोडून ठेवल्या. डब्यां-

तून एक बाटली दारू काढून घेतली. तोंच दारावर थाप बसली. हमालानं दार उघडलं. दोन व्यक्ति आंत आल्या. जोसेफ आणि त्याचा पाहुणा. तिघेही त्या अंधुकशा उजेडांत चटईवर येऊन बसले. जवळच एक घासलेटचा दिवा तेवत होता. त्या प्रकाशांत तिघांपैकीं २ चेहरे एकमेकांकडे ' आ ' वासून पाहूं लागले.

जोसेफ तो प्रकार पाहून गोंधळला.

पाहुणा मनाशीं म्हणत होता—" हाच तो भाऊच्या धक्क्यावरील हमाल ! ! "

—आणि ४३ नंबरचा तो हमाल ?—महादेवाच्या पिंडीसमोरील लिंगाप्रमाणें मौनवृत स्विकारून आश्चर्यचकीत चेहऱ्यानं त्या पाहुण्याकडे पहात सुटला होता—

---

# विनयभंग

मी घरांत पाऊल टाकलं मात्र, तोंच चंदा हुंदके देऊन रडतांना मला दिसली. मला त्याचा अर्थच समजेना. मी गोंधळून तिला प्रश्न केला—"कां रडतेस चंदा तूं?"

तिनं घडलेली हकिगत मला सांगितली.

चीड आणण्यासारखी ती घटना होती. तो प्रसंग साधासुधा नव्हता. स्वतःच्या लग्नाच्या बायकोचा परपुरुषानं विनयभंग केलेला पाहून कोणत्या विवाहीत पुरुषाचं मस्तक भडकणार नाहीं? पण माझ्या बाबतींत हा प्रश्न साहाजिकच अपवाद ठरला. मी चिडलों नाहीं. कुणाला अपशब्द बोललों नाहीं. उलट, माझ्या चंदाचा विनयभंग करणाऱ्या शांतारामची मला दया आली—

चंदाशीं माझं लग्न होऊन दोन वर्षे झालीं होतीं. तेव्हांपासून चंदाच्या माहेरच्या ओळखीनं शांताराम आमच्याकडे नियमानं यायचा. त्याला नोकरी नव्हती. नोकरी करण्यासारखं त्याला शिक्षण नव्हतं. ताकद नव्हती. शिवाय तो मुखदुर्बळ होता. त्याचं लग्न झालेलं नव्हतं. होण्याची आशा नव्हती. आपल्या ४२ वर्षांच्या आयुष्यांत त्यानं कधीं स्त्रीचें तोंडही पाहिलं नसावं. तो एका पायानें किंचित लंगडा होता. त्याच्या सबंध चेहऱ्याला देवीचे वण होते. बोलतांना त्याची जीभ मधून मधून अडखळायची.

चंदाला एक वाईट खोड होती. स्वत.ची करमणूक करण्यासाठीं एकाद्याची फाजील 'टर' उडविण्यांत तिला मोठी गम्मत वाटे. शांतारामचीहि ती अशीच थट्टा करायची. ती त्याला त्याच्या लग्नासंबंधीं विचारी. तो उसासा सोडी. कथाकादंबऱ्यांतून वाचलेल्या नायक-नायिकांच्या रम्य रात्रींच्या संशयास्पद हालचाली, त्यांच्या चोरट्या प्रेमाचे संकल्प, उष्ण उसाशासरशीं निनादणारे त्यांच्या अंतर्यामींचे भावमधुर बोल यांचं रसभरीत वर्णन शांतारामला ती सांगायची. एखादेवेळीं त्याच्या कोटाच्या कॉलरमध्यें गुलाबाचं फूल स्वतःच खोवायची चंदा. जोडीनं त्याच्या बरोबर 'चहा' घ्यायची. त्याच्यासह 'केरम' खेळायची. मनमुराद हंसायची. त्याच्या खांद्यावर हात ठेवायची. त्यानं सांगितलेल्या कहाण्या एक-

चित्तानं ऐकायची. हें सगळं ती निष्पाप मनानं करी हें खरं! पण शांतारामसारख्या अतृप्त कामवासनेनं भारावलेल्या मनुष्यानं त्या अर्थाचा अनर्थ केल्यास नवल काय?—

—आणि आज माझ्या गोऱ्यागोमट्या चंदावर हात टाकून त्यानं जो तिचा विनयभंग केला होता, त्याला झालं तरी बहुतेक तिची ही अमर्याद वागणूकच कारणीभूत झाली असावी—

० ० ० ०

चंदा रडते आहे! का? शांतारामनं आपला विनयभंग केला म्हणून! दोष शांतारामचा होता का? लोण्याचा गोळा चुलीजवळ नेऊन ठेवायचा आणि तो वितळला म्हणून त्यालाच दोष द्यायचा! ही रीत का झाली?—

शांतारामला एकंदर घडलेल्या प्रकाराबद्दल मी मनांतून कधींच क्षमा केली होती.

—पण—

० ० ० ०

रात्र पालटली.

दिवस उजाडला.

वृत्तपत्रें विकणारा पोऱ्या नेहमीप्रमाणें दाराच्या फटींतून 'लोकमान्य' टाकून गेला.

उघडून पहातों, तो कल्पनेलाही न पटणारी बातमी—
मी चपापलों.

क्षणांत मी चंदाला बोलावून घेतलं; नी तिला उद्देशून म्हटलं—"रात्रौ शांतारामच्या गुन्ह्याबद्दल मी मुग्धता स्वीकारलेली पाहून 'भ्याड' हें विषेशण तूं मला बहाल केलं होतंस ! बिचारा शांताराम ! त्याला शिक्षा करायला दुसरं माणूस नको होतं ! त्यानं स्वतःच स्वतःला शिक्षा केली—"

"—काय केलं त्यानं ?—"

मी हातांतील लोकमान्याचा अंक तिच्यापुढं धरीत म्हटलं—"आत्महत्त्या ! !"

११

# दारावरची वेल

स्टंट बोलपट काढण्यांत हातखंडा असलेल्या 'रुबी पिक्चर्स' या मुंबईतील फिल्म कंपनींत नायिकेची तडफदार भूमिका करण्यांत सुविख्यात असलेली सिने-तारका आंद्रबाला ती हीच—

तिनें 'रुबी पिक्चर्स'च्या ५।६ स्टंट बोलपटांतून धाडसी भूमिका केल्या होत्या. घोड्यावर बसणं, चाबकांचा आवाज काढणं, पुरुष वेषांत फिरणं, पोहणं, हिंस्रश्वापदांशीं गुजगोष्टी करणं, आणि विशेषत: खलपुरुषांना नियमानं 'पाणी' चारणं वगैरे सारखे धडाडीचे प्रकार यशस्वी रीतीनें हाताळले होते.

—पण आज ?—

ती एका निराळ्याच पेंचप्रसंगांत सांपडली होती. सत्यसृष्टींतील खलनायक म्हणजे कांहीं सिनेमांतील बेगडी पात्र

नव्हे, याचा ती त्या प्रसंगीं अनुभव घेत होती.

अर्धा तास झाला असेल. तिच्या दारावरची बेल पुन्हां पुन्हां वाजत होती. तशांत ती घरांत एकटी ! किती घाबरली होती पण ती त्या प्रसंगीं—

बेल तर सारखी आवाज देत होती.

'रुबी पिक्चर्स'मध्यें खातुम नांवाचा एक आरब नट होता. त्याचं आणि आंद्रबालेचं दोनच दिवसांपूर्वीं कांहींतरी बिनसलं होतं. खातुम चिडून गेला होता. त्यामुळें, वैतागून आंद्रबालेचा प्राण घेण्याची भाषा म्हणे तो आपल्या एका मित्राशीं बोलला होता. साहजिकच बेल वाजवणारी व्यक्ति हीं खातुमच असली पाहिजे याविषयीं आंद्रबालेला संशय राहिला नाहीं. काय करावं हें तिला कळेना. दार उघडणं तर तिला धोक्याचं वाटलं. क्षणांत एक कल्पना सुचली तिला. तिच्याकडे टेलिफोन होता. त्याच्या सहाय्यानं तिनं आपणावरील दुष्प्रसंगाची चौकीवरील पोलिस अधिकाऱ्याला कल्पना आणून दिली. आणि वाट पहात राहिली ती पोलिसांची—

रीतसर पोलिसांची मोटर येऊन थडकली. पोलिस वर आले. त्यांनीं बेल वाजविण्याऱ्या इसमास पकडून ठेवलं. आणि आंद्रबालेला दार उघडविण्याविषयीं बाहेरून फर्माविलं.

तिनं दार उघडलं. पकडून ठेवलेला इसम सांगत

होता—" मी काहीं कुणि लफंगा नव्हे ! नाटकाला गेलों होतों गंधर्वांच्या ! प्रयोग संपेपर्यंत दोन वाजले ! काळोखामुळं व विशेषतः मला डोळ्यांनीं स्पष्ट दिसत नसल्यामुळं हा एकंदर घोंटाळा झालेला दिसतो ! Excuse me ! कारण माझ्यामुळं तुम्हां सर्वांनाच बराच त्रास झालेला दिसतो—"

आंद्रबाला मोठमोठ्यानं हंसूं लागली. आणि पोलिसही पण—

# चकवलें बेट्यानें !

समुद्रस्नान म्हटलं कीं, मी वेडापिसा होतों. किती क्षुल्लक नाद हा! पण तेवढ्यामुळेंच तर वर्षांतून निदान ४।५ खेपा होत असतात माझ्या या सोनगांवांत—

चार दिवसापूर्वी मीं जो इथं आलों होतों, तोहि याच हेतूनं—

वेळ सायंकाळची होती. शेकडों स्त्री-पुरुष स्नानाच्या निमित्तानं सोनगांवच्या वेळेवर गोळा झाले होते. मीहि स्नान करण्याच्या तयारीनं तिथं आलों होतों. झालं. कपडे उतरून वाळवंटांत ठेवले. एक पंचा गुंडाळला अन् उतरलों एकदांचा पाण्यांत. समुद्राच्या त्या खेळकर लाटा आंगावर घेतांना और मजा आला—

एकाएकीं कसली तरी किलबिलाट सुरू झाली किनाऱ्या-वर. काय आहे म्हणून डोकं वर करून पाहिलं. आस-

पास एकच एक आवाज घुमत होता. 'चोर....चोर....!!' अन् लागोपाठ धांवपळ, बोंबाबोंब आणि गोंधळ—

मीहि चटकन् पाण्यांतून वर आलों. चौकशी केली. कोणाचा तरी कोट चोरीला गेला होता. एका परिटाला ही चोरी उमगली. आणि त्यानंच पहिल्या प्रथम 'चोर, चोर' म्हणून ओरड केली. कोट उचलणारी व्यक्ति एक स्त्री होती. ओरड होतांच ती पळूं लागली. अनेकांनीं तिचा पाठलाग केला. आणि पारध्यांच्या तांड्यापुढें हारिणीचा निभाव लागला नाहीं. साहजिकच ती पकडली गेली. चोरीला गेलेला कोट दुसऱ्या कोणाचा नसून माझा स्वतःचाच होता. कर्मधर्मसंयोगानें ती निसटती तर दीडदोनशें रुपयांना नागवलों असतों मी. कोट लांबविणारी स्त्री म्हणजे चाकूसुऱ्यांचा धंदा करणारी एक काबुली बाई होती. हिंदुस्थानांतील कोणतीच भाषा अवगत नव्हती तिला. तोंड असून ती मुकी ठरली. कोट कां पळविला याचं कारण लोक तिला विचारीत. तिला उत्तर देतां येईना. कोटांतील एकूण एक चिजवस्तु जाग्यावर होती. मी प्रथम कोट हस्तगत केला. लोक तिला पोलिस ठाण्यावर नेण्याची भाषा बोलूं लागले. मला तें कसंसच वाटलं. पण लोकांच्या आग्रहापुढें नाइलाज झाला. पोलिसाच्या सहाय्यानं मी तिला अखेर ठाण्यावर नेलं.

फौजदारांनीं मला 'काय झालं?' म्हणून विचारलं. मी झालेली हकिगत त्यांनां सांगितली. ते त्या आरोपी स्त्री-कडे पाहूं लागले. त्यांनीं एक सुस्कारा टाकला. आणि फौजदार मला एका बाजूला घेऊन गेले. त्यांनीं माझी समजूत पाडायला सुरवात केली. ते म्हणाले—" दोनच महिन्यापूर्वींची गोष्ट. चोरीच्या आरोपावरून अशाच एका काबुली स्त्रीला मी अटक केली होती. केस कोर्टांत आली त्यावेळीं आरोपी स्त्रीनें सांगितलें कीं, फिर्यादीनें आपणाला आदल्या रात्रीं बंगल्यावर नेऊन आपणाशीं शरीर संबंध केला. मात्र तत्संबंधी देऊं केलेल्या मोबदल्याची अट पुरी केली नाहीं, त्यामुळं आपण त्यांना शिवीगाळ केली. तें सहन न होऊन त्यांनीं आपणावर चोरीचा आळ घातला असावा, किती निर्लज्जपणें सांगितलं तिनं हें! बाकी कोर्टानें ही तिची जबानी अविश्वसनीय मानली ही गोष्ट निराळी! पण समजा, या बाईनंही असाच कांहीं लज्जा-स्पद आरोप उद्यां भर कोर्टांत तुमच्यावर केला, तर तुमची नाहक छीः थू होईल! तुम्ही परगांवचे, तशांत प्रतिष्टीत गृहस्थ दिसतां म्हणून तुम्हांला सांगितलं. विचार करा. तुम्ही सांगत असाल तर मी हिला अटकेंत ठेवतों. पण यांत तुमची दोन दृष्टीनं नुकसानी आहे. एक बेअब्रु होण्याची

व केसचा निकाल लागेपर्यंत तुम्हाला कोर्टात हजर रहाण्याची—"

विचारांती मी तो प्रश्न फौजदारांच्या मर्जीवरच सोपवला.

° ° °

गांवी परत जाण्यासाठीं मी दुसरें दिवशीं सकाळीं टांग्यांतून स्टेशनकडे चाललों होतों. टांगा चालू असतांना टांगेवाल्याला एकदोन वेळां डुलक्या देतांना पाहिलं. त्याला सावध करावं म्हणून मी म्हटलं—"कां रे, झोंप नाहीं वाटतं घेतलीस काल रात्रीं!" तो हंसला व म्हणाला—"लय जागरण घडलं रावसाहेब काल रात्रीं! तो पोलिस ठाण्यावरचा फौजदार एका काबुली बाईला बरोबर घेऊन धुडगूस घालीत होता बेटा सारी रात माझ्या टांग्यांतून!—"

---

प्रिय जनास भेट देण्याकरितां

# तुमच्या नांवाची




**पसंतीकरितां शोरुमला प्रत्यक्ष भेट द्या आपल्या ऑर्डर्स नोंदवा.**

यंदा खास तुमच्या दिवाणखान्याची शोभा वाढविण्याकरितां

सुंदर स्टॅच्यूज् तयार केले आहेत.

**तुम्हांस पसंत पडतील कां ?**